

नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत मराठी अभ्यास परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या भाषा आणि जीवन ह्या नियतकालिकाच्या (त्रैमासिक) अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून मराठी अभ्यास परिषदेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व मराठी अभ्यास परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व मराठी अभ्यास परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका

## अनुक्रमणिका



---

**प्रकाशन : त्रैमासिक** (जानेवारी, एप्रिल, जुलै, ऑक्टोबर)
**संपादन - समिती :** मृणालिनी शहा (प्रमुख), अशोक रा. केळकर,
गं. ना. जोगळेकर, मॅक्सीन बर्न्सन, प्र. ना. परांजपे, द. दि. पुंडे,
आशा मुंडले, अंजली सोमण, विजया देव, नीलिमा गुंडी
**संपादकीय संपर्क व परीक्षणार्थ पुस्तके :** मृणालिनी शहा, १, शीतल अपार्टमेंट,
४६/४, एरंडवणे, पुणे ४११ ००४. दू. क्र. ५४३३८६९
**व्यवस्थापकीय संपर्क व पैशांचा भरणा :** नीलिमा गुंडी, ३, अन्नपूर्णा, १२५९,
शुक्रवार पेठ, सुभाषनगर गल्ली क्र. ५, वाडिया हॉस्पिटलसमोर,
पुणे ४११ ००२. दू. क्र. ४४८६०१५
**पत्रिकेची वर्गणी, जाहिरातीचे दर :** आवरणपृष्ठ तीन पहा.
**सूचना :** पत्रिकेत प्रसिद्ध होणाऱ्या लेखांच्या / लेखकांच्या मतांशी संपादक किंवा परिषद
सहमत असतीलच, असे नाही.

या अंकाच्या प्रकाशनासाठी महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृति-मंडळाचे अंशतः अनुदान मिळालेले आहे. तथापि या नियतकालिकातील लेखकांच्या विचारांशी मंडळ व राज्यशासन सहमत असेलच असे नाही.

---

**संपादक :** मृणालिनी शहा, **प्रकाशक व मुद्रक :** मराठी अभ्यास परिषदेसाठी
नीलिमा गुंडी
**मुद्रण स्थळ :** पद्मरंग्रा आर्टस्, १९४/२, नवी पेठ, पुणे ४११ ०३०

# भाषिक क्षमतांची निगराणी

दरवर्षी विद्यार्थ्यांच्या उत्तरपत्रिका तपासताना अध्यापकाच्या मनात काही प्रश्नचिन्हे निर्माण होतात. उच्च माध्यमिक स्तरावरील अनेक विद्यार्थ्यांना 'वाक्प्रचारांचा अर्थ सांगणे व वाक्यात उपयोग करणे', हा प्रश्न समाधानकारकरीत्या का सोडविता येत नाही? - हा सध्या मला पडलेला प्रश्न आहे. खरे तर, भाषेची अंगभूत अशी अलंकरणक्षमता वाक्प्रचारांतून व्यक्त होत असते; परंतु जेव्हा विद्यार्थ्यांना 'दंड थोपटणे म्हणजे शाबासकी देणे' आणि 'डोळ्यांत तेल घालणे म्हणजे डोळ्यांत अंजन घालणे' असे अर्थ (!) सुचतात, तेव्हा ती उत्तरे शिक्षणव्यवस्थेच्याच डोळ्यांत अंजन घालतात आणि या वस्तुस्थितीमागची कारणपरंपरा शोधायला भाग पाडतात.

शालेय पातळीवर जर विद्यार्थ्यांच्या भाषिक क्षमतांकडे योग्य प्रकारे लक्ष पुरवले तर हे चित्र थोडे बदलू शकेल, असे वाटते. हल्ली गुणप्राप्तीवर अतिरिक्त भर येत चालल्यामुळे भाषेसारख्या विषयाबाबतही वस्तुनिष्ठ (खरे तर शब्दनिष्ठ!) उत्तरांना महत्त्व येत चालले आहे. वस्तुनिष्ठ प्रश्नांची उत्तरे वस्तुनिष्ठ लिहिणे आवश्यकच आहे; परंतु सविस्तर उत्तरे लिहितानाही पुस्तकातील वाक्ये जशीच्या तशी (पाठ करून!) लिहिण्याकडे मुलांचा कल दिसतो. आपण जर पुस्तकातील भाषेत उत्तर लिहिले तरच चांगले गुण मिळतील, असा त्यांचा समज झालेला दिसतो. त्यामुळे आवश्यक तेथेही स्वतःच्या भाषेत स्पष्टीकरण देण्याचे मुलांनी टाळलेले असते. अशा वेळी स्वतःची भाषाशैली विकसित करण्याचे ध्येय त्यांच्याकडून कसे साध्य होणार?

वास्तविक भाषेमध्ये एकेका शब्दाला असलेले असंख्य पर्याय, त्या पर्यायांच्या वापरामागचे लिखित-अलिखित नियम यांची ओळख प्राथमिक स्तरावरच रंजक पद्धतीने व्हायला हवी. लहान वयात कुतूहल जागे ठेवून मुलांना भाषेची गोडी लावणे आवश्यक असते. एकेका शब्दाच्या बदलामुळे अर्थछटांचे इंद्रधनुष्य कसे उलगडत जाते; याचे त्यांना भान येणे गरजेचे असते. उदा. एखाद्याशी हसणे आणि एखाद्याला हसणे यांत फरक आहे. हा फरक चित्रांच्याद्वारेही मुलांपर्यंत पोहोचवता



अनुक्रमणिका

येईल. वाक्प्रचार आणि शब्दप्रयोग यांबाबतही विभक्तिप्रत्ययाचा योग्य तो वापर महत्त्वाचा असतो. उदा. 'दातओठ खाणे' हा वाक्प्रचार शिकवितानाच जर 'अमक्यावर दातओठ खाणे' असाच शिकविला तर विद्यार्थी तो योग्यरीत्या आत्मसात करू शकतील. अन्यथा योग्य विभक्तिप्रत्यय अथवा शब्दयोगी अव्यय यांच्या अभावी वाक्प्रचार गतार्थ होत राहतील!

वाक्प्रचार हे भाषेचे संचित होय. ते आत्मसात केले नाहीत, तर भाषेच्या आकलनाची प्राथमिक पातळीच गाठता येणार नाही. शब्दांचे एकमेकांशी कसे लागेबांधे जुळतात; हे जाणून घेणे खरे तर रोमांचकारकच असते. फक्त भाषाविषयच नव्हे तर इतिहास, विज्ञान इत्यादी सर्वच विषयांच्या आकलनात परिपूर्णता येण्यासाठीही हे ज्ञान आवश्यक असते. उदा. इतिहासाच्या पाठ्यपुस्तकात एखादे वाक्य असे असते, की शेवटी भारतीयांनी ब्रिटिश सरकारचे जू झुगारले. 'जू झुगारणे' हा वाक्प्रचार माहीत नसला की वाक्याचा अर्थबोध होत नाही. शब्दकोश हाताळण्याची सवय असेल तर बरे! नाहीतर विद्यार्थ्यांना हळूहळू अर्थ न कळताच उत्तरे लिहिण्याची सवय लागून जाते. म्हणजेच ती निर्बुद्ध पाठांतराकडे वळतात!

भाषेचा विकास हे व्यक्तीच्या सर्वांगीण विकासामागचे एक प्रमुख सूत्र असेल, तर शालेय पातळीवर भाषाशिक्षणाचे महत्त्व अनन्यसाधारण असायला हवे. परंतु आपल्याकडे प्रत्यक्षात तशी परिस्थिती नाही. विशेषतः ठरावीक विषयावर ठरावीक पद्धतीने कवायतीसारखे लेखन करण्यावर भर दिल्यामुळे विद्यार्थ्यांच्या लेखनात साचेबंदपणा येतो. हा साचेबंदपणा भाषेच्या बाबतीत फारच मारक ठरतो. कारण मुलांच्या बौद्धिक आणि भावनिक विकासाची नाळही भाषेशी जोडलेली असते. (गणिताची भाषाच न कळल्यामुळे गणित आले नाही; अशी अनेक मुलांची तक्रार असते!)

समाधानाची गोष्ट अशी की मुलांच्या भाषिक क्षमतांची निगराणी करण्यावर भर देणाऱ्या वेगळ्या प्रकारच्या शाळाही आपल्याकडे आहेत. कल्पक खेळ आणि नावीन्यपूर्ण उपक्रम यांच्या माध्यमातून या शाळांमध्ये मुलांच्या भाषिक विकासाला दिशा आणि गती देण्यात येते. त्यांच्यातील लेखनाची ऊर्मी टिकवून धरून त्यांच्या कल्पकतेला खतपाणी घातले जाते! अशाच एका प्राथमिक शाळेला भेट देण्याचा योग मध्यंतरी आला. निमित्त होते विद्यार्थ्यांनी भरविलेले प्रदर्शन पाहण्याचे! त्या वेळी विद्यार्थ्यांनी स्वतःला सुचलेल्या वेगवेगळ्या विषयांवर केलेले लेखन अनेकांची








दाद मिळवून गेले. त्या लेखनात एक प्रकारचा टवटवीतपणा होता. 'झाडू'सारखा विषयही त्यांना सहज खुणावीत होता. त्यात विषयांची विविधता होती, तशीच विषयात डूब घेण्याची तयारीही होती. चौथीतील एका मुलीने लिहिलेल्या छोट्याशा निबंधाने मला खूपच प्रभावित केले. तिच्या निबंधाचा विषय होता, 'मन'. तिच्या निबंधातील काही भाग मला जसाच्या तसा उद्‌धृत करावासा वाटतो. तो असा :-

"माझे मन म्हणजे माझा फार मोठा मित्र. मी त्याच्यामुळेच पुढे पुढे शिकते. ते कुठे राहते सांगू? त्याच्या घराचे नाव सांगू? ऐका तर मग! ते माझ्या शरीरात राहते. त्याचे घराचे नाव ना ऋतंभरा आहे. ते माझे इतके जिवलग मित्र आहे की ते सांगेल तसेच मी करते. ते म्हणाले हे नको तर हे नको. ते म्हणाले हवे तर हे हवे. त्याचे सर्व मी ऐकते. इतकी आमची पक्की मैत्री आहे. ते फक्त माझ्याशीच बोलते. मी आणि ते काय बोलते ते कुणाला कळत नाही."

एखाद्या तत्त्वज्ञाला शोभेसे हे लेखन आहे. लहान मुलांकडे कल्पना आणि विचार यांचा तुटवडा असतो, असे कोण म्हणेल का? तेव्हा पूरक असे शैक्षणिक वातावरण राखले तर मुलांच्या भाषिक क्षमतांचा विकास होऊ शकतो, हा विश्वास बाळगायला हरकत नाही.

(टीप : ऋतंभरा ही कोल्हापूर येथील सृजन - आनंद विद्यालयाची इयत्ता चौथीतील विद्यार्थिनी आहे.)

■

**नीलिमा गुंडी**

---

**मुखपृष्ठाच्या चित्रावरून आठवणाऱ्या ओळी**

" पाय टाकूनी जळांत बसला असला औदुंबर "

- बालकवी








# ‘युगें अठ्ठावीस ....’

माधव ना. आचार्य

नामदेवरचित विठ्ठलाच्या आरतीमधील ‘युगें अठ्ठावीस विटेवरी उभा’ ही ओळ आपणां सर्वांच्या चिरपरिचयाची आहे. यामध्ये उल्लेखिलेली ‘अठ्ठावीस युगे’ कोणती, असा प्रश्न काही वेळा विचारला जातो. संतसाहित्याच्या काही अभ्यासकांनी याचा थोडाफार उलगडाही केला आहे. उदा. ‘श्री विठ्ठल एक महासमन्वय’ (१९८४) या ग्रंथात डॉ. रा. चिं. ढेरे लिहितात, ‘... पुंडलिकासाठी विठ्ठल अठ्ठावीस युगे विटेवर उभा आणि उगा राहिला आहे, याचा अर्थ विठ्ठल या नाम-रूपाने आम्ही ज्याची अनन्यभावाने भक्ती करतो, ते अनादि-अनंत ब्रह्म भक्त-भाविकांना तारण्यासाठी चालू अठ्ठाविसाव्या मन्वंतरातही सगुण-साकार होऊन पंढरपुरात नांदते आहे’. (पृ. ५०) डॉ. ढेरे यांनी या ठिकाणी ‘मन्वंतर’ हा शब्द लाक्षणिक अर्थाने योजला असावा.

संतसाहित्याचे दुसरे अभ्यासक डॉ. हे. वि. इनामदार ‘नामा म्हणे’ (१९९९) या अगदी अलीकडच्या ग्रंथात नामदेवांच्या उपरोक्त आरतीवरील टिपणामध्ये लिहितात, ‘युगें अठ्ठावीस :- कृत, द्वापर, त्रेता व कली ही चार युगे - चक्राकार गतीने सात वेळा आली, म्हणजे त्यांची संख्या अठ्ठावीस युगांची होते. अर्थात हा गणिती हिशेब झाला. परिणामकारतेसाठी ‘युगें अठ्ठावीस’ हा ‘अतिशयोक्ती’ नामक अर्थालंकारही असण्याची शक्यता आहे.’ (पृ. ३९६)

या दोन स्पष्टीकरणांचा मेळ कसा घालावा, हा एक प्रश्नच आहे. तेव्हा त्या उद्योगात वेळ न मोडता युग, मन्वंतर इत्यादी प्राचीन कालगणनांची माहिती करून घेणे उचित होईल.

हा धांडोळा मी मुळात स्वतःच्या शंकासमाधानासाठी घेतला आहे. या विषयाच्या जिज्ञासूंना एतद्विषयक माहिती एकत्र मिळावी म्हणून थोड्या ऐसपैस रीतीने हे लेखबद्ध करीत आहे. दुसरा बलवत्तर हेतू असा की, या माहितीमध्ये जर कुठे प्रामादिकता असेल तर ती एतद्विषयाच्या जाणकारांकडून दुरुस्त करून घ्यावी.



अनुक्रमणिका

या धांडोळ्याची सुरुवात संतसाहित्यातील 'अठ्ठावीस युगांच्या' काही ठळक उल्लेखांपासून करतो. या उल्लेखांसाठी मी हाताशी असणारा 'सकलसंतगाथा' (भाग १ व २ संपादक का.अ. जोशी, दु.आ. १९६७) वापरीत आहे. संदर्भांचे अंक हे त्या संतांच्या अभंगांचे क्रमांक आहेत.

निवृत्तिनाथ - युगें अठ्ठावीस उभा हृषीकेश ।
पुंडलिका सौरस पुरवित ॥ (२.३)

ज्ञानदेव - हें नव्हे आजिकालिचें । युगां अठ्ठाविसांचें ॥ (६४)

नामदेव - १) युगां अठ्ठावीसांवरी । आहे पुंडलिकाच्या द्वारीं ।
विठ्ठल उभा उभा भीमातीरीं । (३९५.२९)

२) अठ्ठावीस युगें उभा विटेवरी ।
मुद्रा अगोचरी लावूनिंया ॥ (१५७२)

३) अठ्ठावीस युगें उभा चंद्रभागें ।
परी पालटची नेघे पांडुरंग ॥ (१८१६)

४) अठ्ठावीस युगें उभा ठेला द्वारीं ।
पुंडलिकावरी ठेवुनि लक्ष ॥ (२०३१)

आरतीमधील उल्लेख (२३६६) वर आलाच आहे. शिवाय या जोडीलाच नामदेवांचा एक अभंग प्रस्तुत विषयाच्या उलगड्याच्या दृष्टीने महत्त्वाचा आहे. त्याचा निर्देश लेखाच्या शेवटी करतो.

भानुदास - भाविकांसाठीं उभा । विठु कैवल्याचा गाभा ॥
युगें झालीं अठ्ठावीस । उभा पुंडलिका पाठिस ॥ (३२)

एकनाथ - १) भक्तांद्वारीं उभाचि तिष्ठे । न बोले न बैसे खलुता ॥
युगें जाहलीं अठ्ठावीस । धरुनी आस उभाची ॥ (४८४)

२) युगें अठ्ठावीस नीट । उभा विटे कर धरूनियां कट ॥
(४८८.३)

३) अठ्ठावीस युगें जालीं । अद्यापि न बैसे खालीं ॥ (४९१.३)

४) जुनाट जुगादीचें नाणें । बहु काळाचे ठेवणें । पुंडलिकाचे पायाळपणें ।
उभे ठेलें विटेवरी । युगे जाहलीं अठ्ठावीस । ...(६६२)

तुकाराम - १) कां रे प्रेमें मातलासी । उभें केलें विठ्ठलासी । ...
युगें झालीं अठ्ठावीस । अजुनी न म्हणसी बैस ॥ (२९९५)

---

२) आठवी माझी ओवी अठ्ठावीस युगें । उभा चंद्रभागे
पांडुरंग ॥ (३२८०.८)

३) न बैससी खालीं । सम उभाच पाऊलीं ॥
ऐसे झाले बहुत दिस । झालीं युगें अठ्ठावीस ॥ (३५५८)

हे असे वारंवार आलेले उल्लेख पाहिले, की अठ्ठावीस युगांची संकल्पना सर्वच संतांच्या भावविश्वात रुजलेली दिसते. तिचा उलगडा करण्यासाठी आता युग इ. परिमाणांची ओळख करून घेऊ.

**युग**

ज्याचा नेमका अर्थ कालौघात बदलत आला आहे, असे हे एक कालपरिमाण आहे. कृत, त्रेता, द्वापर व कली ही युगनामे परिचयाची आहेत. या चार युगांमिळून होणाऱ्या कालखंडाला चतुर्युग, युगचतुष्क, दिव्ययुग, महायुग, युगपर्यय (पर्यय = पुनरावृत्ती, फेरा) किंवा युगचौकडी असे म्हटले जाते. (क्वचित् 'युग' याच शब्दाने या चतुर्युगांचा निर्देश केलेलाही मिळतो) दिव्ययुग म्हणजे देवांचे युग. दिव्य वर्षे म्हणजे देवांची वर्षे. एक दिव्य वर्ष म्हणजे ३६० मानवी वर्षे. एक दिव्ययुग म्हणजे १२००० दिव्य वर्षे म्हणून एक दिव्ययुग म्हणजे ४३, २०, ००० (त्रेचाळीस लक्ष, वीस हजार) मानवी वर्षे. या गणितात आणखीही एक बारकावा आहे. एक युग संपून नवे सुरू होताना जो संधिकाल असतो त्याला युगारंभी संध्या व युगान्ती संध्यांश म्हणतात. ह्या संध्या व संध्याशांच्या कालखंडांसह चार युगांचे कालखंड पुढीलप्रमाणे सांगितले जातात -

| | युगकाल | संध्यावर्षे | संध्यांश वर्षे | एकूण वर्षे |
|---|---|---|---|---|
| कृत | ४००० | ४०० | ४०० | ४८०० |
| त्रेता | ३००० | ३०० | ३०० | ३६०० |
| द्वापर | २००० | २०० | २०० | २४०० |
| कली | १००० | १०० | १०० | १२०० |
| | | | | १२,००० |

ही सर्व दिव्यवर्षे आहेत.

यावरून लक्षात येते की, कलियुगाच्या दुप्पट, तिप्पट व चौपट कालावधी अनुक्रमे द्वापर, त्रेता व कृत या युगांचा आहे. किंबहुना कृत = ४, त्रेता = ३, द्वापर = २ व कली = १ याप्रमाणे हे युगनामशब्द संख्यांचेही संकेत आहेत.

या युगनामांचा द्यूतातील फाशांशीही संबंध आहे. या फाशाच्या चार बाजूंवर १,२,३, व ४ असे ठिपके असतात व त्यांना अनुक्रमे कली, द्वापर, त्रेता व कृत असेच म्हटले जाते.

कल्प - 'युग' या संकल्पनेची माहिती नोंदताना, बारा हजार दिव्यवर्षांचा उल्लेख येऊन गेला. ही एका युगचौकडीची (= दिव्ययुगाची / महायुगाची) दिव्यवर्षे आहेत. अशा एक हजार युगचौकड्या म्हणजे ब्रह्मदेवाचा एक दिवस. यालाच 'कल्प' असे म्हणतात.

'कल्प' ही संज्ञाही प्राचीन आहे. 'धाता यथापूर्वं अकल्पयत्' या वेदवचनावरून ही संज्ञा आली. 'कल्पादौ विसृजाम्यहम्' (भगवद्गीता ९.७) यात श्रीकृष्णांनी कल्पारंभी होणाऱ्या सृष्टीच्या नवनिर्माणाचाच उल्लेख केला आहे. भागवतपुराण सांगते, 'अशा दिवसांनी युक्त असणारे ब्रह्मदेवाचे आयुष्य शंभर वर्षांचे असते. या आयुष्याच्या प्रत्येक अर्धाला 'परार्ध' म्हणतात. सांप्रत ब्रह्मदेवाच्या आयुष्याचा पूर्व परार्ध संपला असून दुसरा परार्ध चालू आहे' (श्रीमद्भागवत ३.११.३२-३२)

मानवी महिन्याचे जसे तीस दिवस असतात, तसे ब्रह्मदेवाच्या महिन्याचे तीस 'कल्प' असतात. या कल्पांची संख्या व नावे यामध्ये काही मतभेद आहेत. ते बाजूला ठेवून मत्स्यपुराणातील यादी लक्षात घेऊ. बहुतेक कोश हीच यादी देतात -

१) श्वेत २) नीललोहित ३) वामदेव ४) रथंतर ५) रौरव ६) देव ७) बृहत् ८) कंदर्प ९) सद्य १०) ईशान ११) तम १२) सारस्वत १३) उदान १४) गारुड १५) कौर्म १६) नारसिंह १७) समान १८) आग्नेय १९) सोम २०) मानव २१) तत्पुरुष २२) वैकुंठ २३) लक्ष्मी २४) सावित्री २५) घोर २६) वाराह २७) वैराज २८) गौरी २९) माहेश्वर ३०) पितृ.

- सध्या यापैकी सव्विसावा 'वाराह' हा कल्प चालू आहे. भागवत पुराण सांगते, 'सांप्रत जो हा कल्प चालू आहे, तो दुसऱ्या परार्धाच्या आरंभीचा आहे. तो 'वाराह' या नावे प्रसिद्ध आहे. कारण या कल्पात श्रीहरींने वराहाचे रूप धारण केले.' (श्रमद्भागवत ३.११.३६)

'वराह' हा विष्णूचा तिसरा अवतार. हिरण्याक्ष या असुराने पृथ्वीला पाताळात पळवून नेले. तेव्हा विष्णूने वराहाचे रूप घेऊन आपल्या सुळ्याने पृथ्वीला वर उचलून आणले. या अवताराचा (व म्हणूनच कल्पाचाही) उल्लेख 'श्वेतवाराह' असाही केला जातो. कारण विष्णूने धारण केलेले हे वराहरूप पांढऱ्या रंगाचे होते.





अनुक्रमणिका

मनू व मन्वंतर - हे शब्द आता लक्षात घेऊ. 'मनू' हा प्रजापतींपैकी एक. त्याचा जो कालखंड ते 'मन्वंतर'. मात्र 'मनू' हाच शब्द काही ठिकाणी 'मन्वंतर' या अर्थीही योजलेला आढळतो. ब्रह्मदेवाचा एक दिवस म्हणजे कल्प हा एक हजार युगचौकड्यांचा (म्हणजेच दिव्ययुगांचा वा महायुगांचा) हे आपण नोंदलेच आहे. यामध्ये १४ मन्वंतरे होतात. हा काळ दोन मनूंमधील संधिकालांसह १४ मनूंचा. संधिकाल ६ युग चौकड्यांइतका असतो. म्हणून कल्पाच्या एक हजार युगचौकड्यांमधून या ६ युगचौकड्या वजा केल्यास ९९४ युगचौकड्या हा प्रत्यक्षपणे १४ मनूंचा कालखंड ठरतो. त्यावरून एका मनूचा कालखंड (९९४ ÷ १४ =) ७१ युगचौकड्या इतका ठरतो.

पुराणांनी या १४ मनूंची / मन्वंतरांची नावे दिली आहेत, ती अशी १) स्वायंभुव २) स्वारोचिष ३) उत्तम ४) तामस ५) रैवत ६) चाक्षुष ७) वैवस्वत ८) सावर्णी ९) दक्षसावर्णी १०) ब्रह्मसावर्णी ११) धर्मसावर्णी १२) रुद्रसावर्णी १३) देवसावर्णी आणि १४) इंद्रसावर्णी.

सध्या 'श्वेतवाराह' हा कल्प चालू आहे. त्यातील पहिली सहा मन्वंतरे संपली. सांप्रत 'वैवस्वत' नावाचे सातवे मन्वंतर चालू आहे.

या वैवस्वत मन्वंतरातीलही सत्तावीस युगचौकड्या वा महायुगे/दिव्ययुगे संपली. सध्या अठ्ठाविसावी युगचौकडी चालू आहे. यातील ही पहिली तीन कृत, त्रेता व द्वापर ही युगे संपून कलियुग चालू आहे. (भारतीय ज्योतिःशास्त्र अथवा भारतीय ज्योतिःशास्त्राचा प्राचीन व अर्वाचीन इतिहास, कै. शं. बा. दीक्षित १८९६, संदर्भप्राप्त द्वु.आ. १९३१ पृ.११) येथवरच्या धांडोळ्यावरून 'युगें अठ्ठावीस'चा उलगडा असा करता येईल - 'ब्रह्मदेवाच्या दिनारंभापासूनच्या सव्विसाव्या 'वाराह' नामक कल्पातील सातव्या वैवस्वत नामक मन्वंतरातील २८ युगचौकड्या महायुगे / दिव्ययुगे' - येथे अभिप्रेत आहेत. म्हणजे ही २८ मन्वंतरे नव्हेत; चार युगांचे हे सात फेरेही नव्हेत आणि हा 'अतिशयोक्ती' नामक अलंकारही नव्हे. याच पार्श्वभूमीवर आता आपल्या धर्मकृत्यारंभीचा स्थलकालांचा निर्देश करणारा संकल्प नोंदून ठेवू. हा संकल्प असा आहे - 'श्रीमद्‌भगवतो महापुरुषस्य विष्णोराज्ञया प्रवर्तमानस्य अद्य ब्रह्मणो द्वितीये परार्धे विष्णुपदे श्रीश्वेतवाराहकल्पे वैवस्वत मन्वंतरे अष्टाविंशतितमे युगचतुष्के कलियुगे प्रथमचरणे जम्बुद्वीपे भरतवर्षे भरतखण्डे दण्डकारण्यदेशे गोदावर्याः दक्षिणे तीरे .....इ.'

या संकल्पातील कालोल्लेखही अठ्ठावीस युगचौकड्यांचा आहे.

आता शेवटी लेखारंभी नामदेवांच्या अभंगातील संदर्भ देताना बाजूला ठेवलेला अभंग लक्षात घेऊ. हा अभंग असा आहे -

कृत त्रेता द्वापार कली । ऐसा चौयुगांचा मेळीं ।
तें महायुग शब्द आढळी । वेदान्त शास्त्रीं ॥ १ ॥
ऐसा ब्रह्मयाचा दिनांतर । तैसीच रात्र एक सहास्त्र ।
तीसा दिवसांचा प्रखर । एक मास ॥ २ ॥
ऐसे बारा मास । त्याचें एक वरुष ।
शतभरी आयुष्य । ब्रह्मयाचें ॥ ३ ॥
ऐसा ब्रह्मयाचा दिनान्त । शत वरुषें गणीत ।
ज्या प्रळयीं पोहत । मार्कंडेय उदकीं ॥ ४ ॥
ऐसी अठ्ठावीस युगें जाण । पंढरपुरासी झाली पूर्ण ।
जो की ब्रह्मयाचा दिन । प्रळय केला ॥ ५ ॥
नामा म्हणे पंढरीची संख्या । सांगितली संतमहंत लोकां ।
लक्षूनि पादुका । विठोबाच्या ॥ ६ ॥ (४१४)

- नामदेवांनाही येथे अठ्ठावीस युगे म्हणजे अठ्ठावीस महायुगेच म्हणजे अठ्ठावीस युगचौकड्याच अभिप्रेत आहेत, हे पहिल्या चरणावरून स्पष्ट होते.

■

**मु. व पोस्ट चौल, ता. अलिबाग, जि. रायगड - ४०२ २०३**



अनुक्रमणिका

# नीर - क्षीर - अविवेक

मो. गो. धडफळे

*[दुधात किमान स्निग्धांशाचं प्रमाण हवं, असा आग्रह सरकारी पातळीवर धरला जाणं रास्तच आहे. मात्र दूध आणि पाणी यांच्या संबंधाकडे संस्कृत व प्राकृत कवींनी, कामशास्त्रज्ञांनी आणि तत्त्वज्ञांनी काहीशा वेगळ्याच दृष्टिकोणातून पाहिलं आहे. त्याची चर्चा.]*

**'वॉटरगेट डेअरी'**

अमेरिकेचे राष्ट्राध्यक्ष निक्सन यांचं वॉटरगेट प्रकरण एकवेळ जगभरात चांगलच गाजलं होतं. मध्यंतरी महाराष्ट्रातही एक वेगळंच 'वॉटरगेट' गाजू लागलं होतं. लहान मुलांच्या लेखनातही त्याचे विनोदी पडसाद उमटू लागले होते. आमच्या नात्यातल्या एका मुलानं पत्रात लिहिलं होतं "आमच्या गवळीदादांच्या डेअरीचं नाव बहुधा 'वॉटरगेट डेअरी' असावं. योग्य आहे म्हणा! 'वॉटर' म्हणजे 'पाणी' व 'गेट' म्हणजे 'दार'. डेअरीच्या नावाला जागून म्हणूनच ते आम्हाला 'पाणी-दार' दूध पुरवत असावेत." या लहान मुलाच्या 'वॉटरगेट' शब्दावरल्या कोटीइतकेच मला आवडलेले दुसरे 'सार्थ' नाव म्हणजे नदीतल्या पाण्याचा उपसा करणाऱ्या पंपाला त्याच्या निर्मात्यांनी दिलेले 'मेघ-दूत' हे नाव. शेतावर पाऊस पडला नाही की हे उपसा-यंत्रच 'मेघाचा दूत' बनून शेतीसाठी पाणी घेऊन येतं. उद्या कोणी दुधातल्या स्निग्धांशाचं मापन करणाऱ्या घनतामापकाला (डेन्सिमीटरला) 'हंस-घनतामापक' किंवा 'हंस-दूत' म्हटलं तर मला मुळीच आश्चर्य वाटणार नाही. 'दूध का दूध और पानी का पानी' अलग करण्याची क्षमता हंसाच्या ठिकाणी असते हा संस्कृतातील एक प्राचीन व प्रसिध्द कविसंकेत आहे. व्यवहारात एखाद्या हंस-दुग्धालयाचे निर्भेळ दूध घेणेच आपण पसंत करू आणि तरीही दूध आणि पाणी यांच्यातील काव्यमय 'गट्टी'दार मैत्रीला दाद देण्यात मागे पडणार नाही. आच दिल्यावर दुधातल्या पाण्याची वाफ होते. ते उतू जायला लागते आणि मग उतू










अनुक्रमणिका

जाण्यापासून रोखण्यासाठी शेवटचा उपाय म्हणून आपल्याला पाण्याचेच दोन थेंब त्याच्यावर शिडकावे लागतात. यामुळं ते शांत होतं. बस! एवढंच स्वयंपाकघरातलं नित्य अनुभवाचं एक नेहमीचं दृश्य; पण सुभाषितकार भर्तृहरीनं दूध व पाणी यांना 'जीवश्च कण्ठश्च' असे मित्र बनवून एकमेकांसाठी जीव टाकणाऱ्या या मित्रांच्या कथेतून 'सज्जनांची मैत्री' कशी असते हे इतक्या प्रभावी रीतीनं सांगितलं आहे की निर्भेळ दुधाचा आग्रह धरणारी आपली व्यावहारिक भूमिका थोडी बाजूला ठेवून नरसिंहशास्त्री यांना म्हणावसं वाटलं की निर्भेळ दुधाची मागणी करणं म्हणजे दोन जिवलग मित्रांची ताटातूट करण्याचं पाप ओढवून घेण्यासारखंच आहे.[१] भर्तृहरीच्या श्लोकाचा मराठी अनुवाद असा. "दुधानं आपल्यात मिसळलेल्या पाण्याला स्वतःचे सर्व (रंग, चव, कसदारपणा) गुण देऊन टाकले. अशा दुधाला 'ताप' होतो आहे हे पाहिल्यावर त्या पाण्यानं आगीत स्वतःला नाहीसं करून टाकलं. (त्याची वाफ झाली) मित्रावरची ही प्राणान्तिक आफत बघून दूधही त्याच आगीत स्वतःला लोटून द्यायला उतावीळ होतं (उतू जाऊ लागतं) आणि शेवटी मित्राशी भेट झाल्यावरच शांत होतं; सज्जनांची मैत्री ही अशी असते!"[२] संस्कृत भाषेचा महिमा तर काय सांगावा? दूध व पाणी यासाठी आपण एकच शब्द वापरू शकतो. 'पयस्' पय म्हणजे 'पाणी' व पय म्हणजे 'दूध' (पयः क्षीरं, पयोऽम्बुच) आता सांगा 'पयात पय' निघाले तर गवळ्याचा काय दोष? पण जाऊ द्या. किमान दुग्धांशाचा आग्रह धरणं योग्य का अयोग्य ह्याची चर्चा या लेखात अभिप्रेत नाही. प्राचीन संस्कृत व प्राकृत साहित्यात दूध आणि पाणी यांच्यातील संबंधाविषयी नेमकं कसं उलटसुलट रीतीनं पाहिलं गेलं आहे एवढंच आपल्याला समजून घ्यायचं आहे.

**संस्कृत व प्राकृत परंपरा**

सूत्ररूपानं सांगायचं तर मला संस्कृत परंपरा ही दूध व पाणी यांच्यांत फारकत करणारी परंपरा वाटते. नीर-क्षीर-विवेक हा तेथे आग्रहानं सांगितला जातो. याउलट प्राकृतात का कोणास ठाऊक मला जी उदाहरणे आढळली ती दूध व पाणी यांच्या मैत्रीचीच. हे म्हणताना मला पूर्ण कल्पना आहे की मीच वर उद्धृत केलेलं भर्तृहरीचं प्रसिद्ध सुभाषित हे संस्कृतातलं आहे. माझं त्यावर म्हणणं एवढंच की हाही अपवाद नव्हे तर भर्तृहरीनं संस्कृत सुभाषितासाठी वापरलेली एक संस्कृतेतर (पाली) कल्पना आहे. कवी भर्तृहरी हा बौद्ध असावा का, याची चर्चा डॉ. दामोदर धर्मानंद कोसंबी व इतर अनेकांनी केली आहे. भर्तृहरीला बौद्ध मानता येईल असा काही खास पुरावा पालि-लिपिटक साहित्यातून देता येईल, हे मी माझ्या इतर प्रकाशित लेखनात दाखवून

दिले आहे. प्रस्तुत संदर्भात बुद्धानं भिक्षूंना केलेल्या दूध व पाणी यांसारखं एकरूप होऊन रहावं या उपदेशाचं स्मरण करून द्यायचं आहे. तो म्हणतो 'खीरोदकी भूला." (विहरथ) "दूध व पाण्यासारखे एकत्र रहा. 'खीर' म्हणजे 'क्षीर' (दूध). सिंधी भाषेत आजही दुधाला हाच शब्द वापरला जातो आणि 'दूध' हा मुख्य घटक असल्यानंच दुधाच्या गोड पातळ पेयाला मराठीत 'खीर' म्हटलं जातं.

एका प्राकृत पद्यात (वज्जालग्गं ७.६७) म्हटलं आहे.

"मित्तं पयतोयसमं सारिच्छं जं न होई किं तेण ।

अहियाएइ मिलंन्तं, आवइ आवट्टए पढमं ॥"

(दूध व पाणी यांसारखी जी मैत्री नाही तिचा काय उपयोग? एकत्र आल्यावर वाढायला हवं आणि फारकत झाल्यावर खंगायला हवं. भाषेच्या दृष्टीनं प्राकृत 'आवट्ट' यापासून मराठीतील 'आट'णे हे क्रियापद सिद्ध होते.)

**नीरक्षीर - तत्त्वज्ञान**

कामशास्त्र

दूध व पाणी यांच्या 'एकपणाचा' दृष्टान्त हा कामशास्त्रापासून अध्यात्मापर्यंत सर्वत्र आढळतो. वात्स्यायन व कल्याणमल्ल आलिंगनांचे बारा प्रकार सांगतात. त्यांतील आठव्या प्रकाराचं नाव आहे 'नीरक्षीरक', कारण यात स्त्री व पुरुष दूध व पाण्यासारखे एकरूप होतात. या एकरूपतेचा दाखला देऊनच जीव व आत्मा यांचं समाधिस्थ ऐक्य आज ओशो रजनीश आपल्याला सांगतात आणि उपनिषदांनीही अद्वैत-अनुभूतीची एक लौकिक झलक म्हणून हाच दृष्टान्त दिला आहे. "यथा स्त्रीपुंसौ सम्परिष्ववेत्तौ न बाह्यं किञ्चन वेद नान्तरम् ।"

बौद्ध - तंत्रशास्त्र

बौद्धांच्या सहजयान या पंथातही 'प्रज्ञा ' व 'उपाय' या दोहोंत दूध आणि पाणी यांच्यासारखं सामरस्य निर्माण होईल. त्याच वेळी निर्वाणाचा लाभ होईल असं म्हटलं आहे.

"उभयोर्मेलनं यच्च सलिल-क्षीरयोरिव ।

अ-द्वयाकारयोगेन प्रज्ञोपायस्तदुच्यते ॥"

वामन पंडिताचा 'समन्वय'

प्रसंगी ज्ञानदेवांवरही टीका करायला मागंपुढं न पाहाणाऱ्या वामन पंडितानं 'यथार्थदीपिका' या आपल्या गीतेवरच्या टीकेत सर्वत्र 'अन्वय-व्यतिरेक' या पद्धतीचा वापर केला आहे. दूध व पाणी एकत्र करणे म्हणजे 'अन्वय' तर

हंसाप्रमाणं दूध व पाणी वेगवेगळं करणं म्हणजे 'व्यतिरेक.'

दूध उदक मिळवणें । दोन्हींस एकत्र करणें ।
हें तो अन्वयाची खूण । लोकरीती ॥
एकावेगळे एक पाहणें । याचे नाव व्यतिरेक ।
जैसें दूध आणि उदक । हंस करिती दो ठायीं ॥

**हंसाचा विवेक**

रामकृष्ण परमहंसांचे उत्तम शिष्य म्हणजे विवेकानंद. विवेकाची महती भारतीय तत्त्वज्ञानात फार मोठी आहे तरीही विवेक व आनंद यांची सांगड घालणारं हे नाव मला त्यातल्या नवीनपणामुळं फार आवडतं.

सर्व योगशास्त्रात विवेकी व्यक्तीला 'सर्द दुःखम्' याचीच जाणीव होते अशी परिभाषा आहे.

'सर्वं दुःखमेव विवेकिनः' अशा स्थितीत 'विवेकिनः आनन्दः' ही मला तत्त्व-विकासाची एक अभिनव दिशा वाटते. हंस या शब्दाचा वैदिक अर्थ 'सूर्य' असाही आहे (हंसः शुचिषत् मुण्डक) ज्ञानगती लाभलेल्या योग्यांना हा शब्द वापरला जातो. उदा. शंकराचार्य 'परमहंस-परिव्राजक ...' इ. आहेत. ऋग्वेदात हंस हा पक्षी नीर-क्षीर-विवेक करतो असे उल्लेख आढळत नाहीत. यजुर्वेदात हंस सोम व क्षीर यांच्यातही विवेक करू शकतो याचे उल्लेख येतात. सायणाचार्य आपल्या भाष्यातून काही शास्त्रीय माहिती सुचवू इच्छितात. त्यांच्या प्रतिपादनानुसार हंसाने जलमिश्रित दुधात चोच घातल्यावर काही स्राव त्याच्या चोचीतून स्रवतो व त्यामुळे दूध व पाणी यांचे पृथक्करण होते. दूध हे 'इमल्शन' आहे हे नक्की. पण हंसाच्या चोचीतून काही 'एन्झाइम्स' द्रवतात व त्यामुळे हे इमल्शन फुटून दुधाचा पनीरसारखा साका तयार होतो का नाही हे पडताळून पाहून सांगण्याचा अधिकार रसायनशास्त्रातल्या विशारदांचा आहे. अजूनही एक शक्यता उरते तिचा निर्देश करतो. संस्कृतात 'क्षीर' हा शब्द दुय्यम अर्थानेही वापरतात. मराठीतही आपण नारळाचं 'दूध' काढणं असं म्हणतो. झाडाच्या चिकाला क्षीर म्हणतात व चिकाच्या झाडांना 'क्षीरिंणः' वृक्षाः असं म्हणतात. हंसाला कमळातले 'बिसतन्तू' फार आवडतात. त्यातलं द्रव पांढरं असतं व तो ते चोचीनं ओढून घेतो. कमळ पाण्यात असतं. पाण्यातून दूध वेगळं करणं म्हणजे हे बिस-द्रवाचं पान तर नसेल?

**टिपा**

१. सी. आर. नरसिंहशास्त्री "स्टडीज् इन संस्कृत लिटरेचर," फर्स्ट सिरीज,

मैसूर, १९३६ पृ. २३.

२. क्षीरेणात्मगतोदकाय हि गुणाः दत्ताः पुरा तेऽखिलाः ।
क्षीरे तापमवेक्ष्य तेन पयसा ह्यात्मा कृशानौ हुतः ॥
गन्तुं पावकमुन्मस्तदभवद् दृष्टवा तु मित्रापदं ।
युक्तं तेन जलेन शाम्यति सतां मैत्री पुनस्त्वीदृशी ॥
(नीतिशतके एकत्रिंशत्तमः श्लोकः)

■

**'यशोदीप' - ब, ज्ञानलमंगल कार्यालयाजवळ, सदाशिव पेट, पुणे - ४११ ०३०**

माझी साहित्याविषयीची आस्था अशी मला भरभरून फिरवून आणीत असते. कोकणी साहित्य संमेलनाला मी गेलो याचं कारण, ते साहित्याचं एक अंगण आहे. भाषा सतत महत्त्वाची नसते. साहित्य मात्र अविरत महत्त्वाचं असते.....

हिंदीतून, पंजाबीतून, मराठीतून, कोकणीतून जमेल तेवढं मी फिरत राहिलो. त्यामुळे आकाश लांबवर अमर्याद पसरलेलं आहे, हे जाणवत राहतं. कोकणी देवनागरीत लिहिली जाते. अर्थात, भाषा कोणत्या लिपीतून लिहिली जाते याला मर्यादित महत्त्व आहे, असं वाटतं. पंजाबीचंच पाहायचं, तर गुरुमुखीतून व उर्दू लिपीतून ती लिहिली जाते. साधारण गेली २०० वर्षे पंजाबी उर्दू लिपीतूनच लिहिली जायची. पाकिस्तानात गेलेला बहुतांशी भाग पंजाबी भाषक आहे. अधिकाधिक लोक सीमेपर्यंत पंजाबी बोलतात व लिहितात. स्वातंत्र्यापूर्वी गुरुमुखीत पंजाबी फार लिहिली जात नसे.

कोकणी आणि मराठीचा स्वाद त्या महिन्याभरात अनेक निमित्तानं मला घेण्याची संधी मिळाल्यानं, त्या अनुभवांची मी फक्त वाचकांपर्यंत वाटणी करीत आहे. एका हिंदीचंच उदाहरण पाहा. हिंदीची असंख्य रूपं आहेत. प्रदेशवार हिंदीचा चेहरा बदलत जातो. पंजाबीचंही असंच आहे. जम्मूला बोलली जाणारी पंजाबी आणि गुरुदासपूरची पंजाबी यांत रेखीव फरक असतो. पुण्याची मराठी व विदर्भातील मराठी यांत फरक असतोच; पण चेहऱ्याच्या छटा बदलल्या तरी काळीज एकच असतं. प्रत्येक प्रदेशाचा सुगंध मिसळत मिसळत भाषेची नदी प्रवाहित राहते. भाषेचे रंग खरोखरीच अपूर्व असतात. अनेकदा त्याला प्रचंड गुंतागुंतही असते; परंतु कोणतीही भाषा प्रत्येकाला आकाश देते. परिणामी क्षितिजांची रंगरंगोटी सतत खुणावत राहते. क्षणोक्षणी क्षितिज वाढतच जातं. क्षितिज असतं आणि नसतंही; पण हे समजण्यासाठी भाषा आणि साहित्याचं वल्हं हाकत राहणं, हाच संस्कृतीचा श्वासोच्छ्वास असतो. ■

**(गुलजार, 'सकाळ', १३ मे २००१)**



अनुक्रमणिका








# आजचा 'सकाळ' वाचलात का?

सुचेता परांजपे

आमच्या शेजारचे आठवलेकाका दिवसभरात एकदा-दोनदा तरी भेटतातच. भेटले की पहिला प्रश्न हा असतो. "आजचा सकाळ वाचलात का? पेट्रोल तीन रुपयांनी वाढलंय म्हणे! त्या बातमीवर थोडीफार टीकाटिप्पणी - खरं तर, टिप्पणी थोडी आणि टीका फार! करून मी पुढे सटकते. डोक्यात तोच विचार असतो. म्हणजे पेट्रोलच्या भाववाढीचा नाही, काकांच्या प्रश्नाचा 'आजचा सकाळ, म्हणे'!

म्हणजे 'सकाळ' हा शब्द पुंलिंगी झाला. का बरं असं झालं असेल?

मराठी शिकताना ज्या गोष्टी गृहीत धरून मी पुढे गेले, त्याच गोष्टी मराठी शिकवताना मात्र दातात अडकलेल्या सुपारीसारख्या टोचतच राहिल्या. वरकरणी निरुपद्रवी असणाऱ्या या गोष्टी. पण जरा रिकामा वेळ मिळाला की आपोआप ज्या सहजतेनं आणि नकळत आपली जीभ त्या सुपारीच्या कणाकडे वळते, त्याचप्रमाणे - माझं मन त्या गोष्टींकडे वळत राहिलं. त्यांचा विचार डोक्यात घोळत राहिला.

त्यातलाच एक म्हणजे मराठी शब्दांना मिळालेलं लिंग. काही शब्द पुंलिंगी तर काही स्त्रीलिंगी आणि काही नपुंसकलिंगी, हे कोणी ठरवलं? तसंच का ठरवलं? काहीतरी कारण असेलच. ते कोणतं?

खूपसे शब्द आपण संस्कृतमधून त्यांच्या लिंगासह उचलले. उदा. मन (सं.मनस् नपुं.) शाळा (सं.शाला, स्त्री), राजा (सं राजन्, पु.) इ. पण काही शब्द मात्र लिंग बदलून आपण वापरायला लागलो. त्यातलं प्रमुख उदाहरण म्हणजे, सविता. आपण मराठी लोक हे मुलीचं नाव म्हणून वापरतो (याला असलेल्या सन्माननीय अपवादांची मला पूर्ण कल्पना आहे!) पण मुळात हा संस्कृत शब्द सवितृ या 'पुं.' नामाचं प्रथमा एकवचन आहे. सविता म्हणजे उगवता सूर्य. ते मुलीचं नाव का असावं?

मराठी भाषकांना संस्कृत व्याकरण माहीत नव्हतं असं नाही; परंतु

आपल्याही भाषेचे काही आडाखे आहेतच की.

सर्वसाधारणपणे 'आ' कारान्त शब्द स्त्रीलिंगी असतात. भाषा, घंटा, शाळा इ. अर्थात काका, मामासारखे नातेवाचक शब्द आणि रस्ता, पंखा यांसारखे बरेच शब्द पुंलिंग. आहेतच. (अजूनपर्यंत तरी मला 'आ'कारान्त नपुं. शब्द आढळलेला नाही!) आणि म्हणून 'आ'कारान्त सविता हा शब्द स्त्रीलिंगी ठरून मुलीचं नाव बनला.

अनेक शब्द परकीय भाषेतून आपण उचलले. उदा. 'शर्ट' आणि 'पँट'. एका कानडी माणसानं मला विचारलं - अहो, शर्ट 'तो आहे, मग ते 'पँट' तेवढं, 'ती' काय म्हणून?'

भाषाशास्त्र वाचणाऱ्यांना याचं उत्तरं माहीत आहेच.

परकी भाषेतून आपण एखादा शब्द उचलला, तर त्या शब्दाला मराठीत जो पर्यायी शब्द असेल, त्याचं लिंग त्या परकी शब्दाला बहाल केलं जातं. या उदाहरणात, शर्टला पर्यायी शब्द 'सदरा' असा आहे. तो पुंलिंगी आहे. म्हणून 'शर्ट' शब्दही पुंलिंगी होणार! तसंच 'पँट'ला मराठी शब्द 'विजार' किंवा 'तुमान' हे स्त्रीलिंगी शब्द म्हणून 'पँट' स्त्रीलिंगीच रहाणार.

ज्या शब्दांना खास मराठी शब्द नाहीत त्या परकी शब्दांच्या लिंगाबाबत मतभेद दिसून येतात. ब्रेड, पेन, हे असे काही शब्द. 'तो ब्रेड' किंवा 'ती ब्रेड' दोन्ही बरोबरीनं वापरले जातात. वास्तविक 'पेन'ला लेखणी (स्त्रीलिंग) किंवा कलम (नपुंसकलिंग) असे मराठी पर्याय असतानाही 'तो पेन' म्हणणारी माणसं आढळतातच.

एक-दोन बाबतीत तर वेगळीच गंमत आढळली.

कोणत्याही शब्दाचं 'वचन बदला' असं म्हटलं, तर आपण फक्त वचनच बदलतो. उदा. रस्ता-रस्ते, पिशवी-पिशव्या इ. म्हणजे, कोणत्याही वचनात शब्दाचं 'लिंग' तेच राहतं. त्यात परिवर्तन होऊ शकत नाही.

पण यालाही अपवाद सापडलेच.

'मला रस्त्यावर एक माणूस दिसला'. या वाक्यातला 'माणूस' शब्द अर्थातच पुंलिंग आहे. आता 'एक' ऐवजी 'चार' शब्द घालून आपण वचन बदलून पाहू. वाक्य असं होईल - 'मला रस्त्यावर चार माणसं दिसली.' इथे, माणूस या पुं. शब्दाचं अनेकवचन माणसं असं नपुं. झालेलं दिसतं.

हे कसं झालं असावं?






एकाने स्पष्टीकरण दिले. 'माणूस' शब्द नपुं.सुद्धा असतो. उदा. आज एक माणूस खूप सुंदर दिसतंय हं!

समजा, 'माणूस' नपुंसकलिंग शब्द आहे म्हणून 'माणसं' हे नपुं. अनेकवचन समर्थनीय आहे. पण मग पुंलिंगी माणूस शब्दाचं अनेकवचन कोणतं? आपल्याला हे मान्य करावंच लागेल की एकवचन पुंलिंग पण अनेकवचन मात्र नपुंसकलिंग आहे.

हाच प्रकार 'मुलगा' या पुंलिंगी शब्दाबद्दलही दिसतो. काही लोक 'हे माझे दोन मुलगे (पुंलिंग)' असं म्हणतात खरं पण जास्त करून 'माझी दोन्ही मुलं (नपुंसकलिंग) अमेरिकेतच असतात" असंच कानावर येतं.

'मुलं' या नपुं. अनेकवचनी शब्दाला जसा 'मुलगे' असा केवळ पुं. अनेक वचनी अर्थ अभिप्रेत आहे तसाच मुलगे (पुंलिंग) आणि मुली (स्त्री.) असा मिश्रलिंगीही अर्थ काही वेळा अभिप्रेत असतो, हेही तितकंच खरं.

एकूणच शब्दाला लिंग कोणतं द्यायचं, याविषयी काही बाबतीत भाषाशास्त्रीय कारणमीमांसा दिसते, तर काही बाबतीत पूर्ण संदिग्धता जाणवते.

काही वेळा मात्र, मराठी मानसिकताही स्पष्ट दिसते.

आपल्या मराठी मनाची अशी एक गोड (गैर?) समजूत झालेली आहे की जे जे आकारांनी मोठ्ठं ते ते पुरुषवाचक. याउलट स्त्रीजात अवघी ठेंगणी-ठुसकी, लहानशी अशी असते. हे काही शब्द पहा.

डबा - पुं. तो मोठा असतो. पण

डबी - स्त्री. ती छोटीशी असते. किंवा

गोळा - पुं. तो मोठा असतो. पण

गोळी - स्त्री. ती छोटीशी तर असतेच, पण

बहुतेक वेळा गोडही असते. म्हणजे आकाराच्या जोडीला काही गुणही आपण त्या त्या लिंगाला चिकटवून टाकतो. याचं उत्तम उदाहरण म्हणजे वडा-वडी. वडा हा आकाराने गोलमटोल, मोठ्ठा आणि चवीला अंमळ तिखटच. हे सगळे गुण आपल्या मते पुरुषी आहेत. म्हणून वडा हा पुं. शब्द झाला. पण वडी? ती कशी आकाराने सुबक, खुटखुटीत आणि मुख्य म्हणजे चवीला गोऽऽड! हे सगळे गुण आपण (का कोण जाणे, पण) स्त्रीत्वाशी जोडून टाकलेत. त्यामुळे वडी हा शब्द स्त्रीलिंगी बनून गेला.

अशा अनेक शब्दजोड्या सापडतील. आपण रोज उठून नवनवीन शब्दही

तयार करतो! 'केवढा मोठ्ठा बाटलोबा आहे हा!' हे मोठ्या बाटलीला उद्देशून म्हटलं जातं. मला आठवतं, मी पहिल्यांदा पोळी लाटायचा प्रयत्न केला, तेव्हा चांगली जाडजूड, खरं तर भक्कमच लाटली. माझी आजी 'निरीक्षणा'साठी कमरेवर हात ठेवून शेजारी उभीच होती. ती चटकन म्हणाली - "पोळा नकोय आपल्याला, पोळी हवीय, पोळी! समजलं?" तेव्हा जे समजलं नव्हतं, ते आज समजतंय. पोळा पुं. म्हणजे जाडाभरडा ठोकळा असला तरी चालेल. पण पोळी - स्त्री. 'बाईच्या जातीनं' कसं मर्यादशील आणि मऊसुत वागलं पाहिजे, तेच त्या 'पोळी'च्या बाबतीतही खरं आहे.

याचाच एक विस्तारित विचार म्हणजे ज्याचा 'उप-मर्द' किंवा थट्टा करायचीय त्याचा नपुं. उल्लेख करायचा. 'आमचं यडं कुठं पाहिलंत का?' किंवा "पात्रच आहे ते एक!" यातलं 'यडं' किंवा 'पात्र' हे स्त्री - पुरुष कोणीही असू शकेल.

थोडक्यात काय तर मराठी शब्दांचा अभ्यास करताना लिंगविषयक वेगवेगळ्या उपपत्त्या लक्षात यायला लागल्या. आणि त्याच, संदर्भात आठवले काकांचा प्रश्न पुन्हा एकदा मनात उमटला -

"आजचा 'सकाळ' वाचलात का?" अगदी प्राथमिक पातळीवर 'सकाळ' हा स्त्री. शब्द आहे. (शहाणी 'सकाळ' ही एक फार वर्षांपूर्वी वाचलेली गोष्ट अचानक आठवली) मग काकांनी "**आजची** सकाळ वाचलीत का?" असं का नाही विचारलं?

त्याच कारण उघड आहे. इथला 'सकाळ' हा शब्द सामान्यनाम नसून एका वृत्तपत्राचं ते विशेषनाम आहे. त्यामुळे सामान्यनामाचं लिंग त्या विशेषनामावर लादंता येणार नाही.

हाच प्रकार काही वेळा उलटाही दिसतो. म्हणजे एखाद्या विशेषनामाचं लिंग त्याच सामान्यनामालाही जोडता येत नाही. उदा. "अरे वा! नवी मारुती घेतली वाटतं?" मुळात रामभक्त 'मारुती' हा पुरुषश्रेष्ठ. त्यामुळे त्या शब्दाच्या पुंलिंगी असण्याबद्दल काही शंकाच नाही. पण ज्या वेळी ते एका प्रकारच्या वाहनाचं नाव बनतं, तेव्हा त्यातलं पुरुषत्व संपतं. ते वाहन गाडी (स्त्री.) असल्यामुळे आपोआपच 'गाडी'चं स्त्रीलिंगत्व त्या 'मारुती'वरही संक्रांत होतं. 'ती मारुती' म्हणताना आपण काही 'लैंगिक गल्लत' करतोय असं एकदा तरी तुमच्या मनात आलं होतं का?











नेमका हाच प्रकार 'आजचा सकाळ' बाबत घडतोय.

कबूल, मग जर का गाडी स्त्री. म्हणून मारुती स्त्री. त्याच धर्तीवर, वृत्तपत्र नपुं. म्हणून सकाळही नपुं. नको का व्हायला? सांगायला नको का आठवलेकाकांना की, "अहो, आजचं 'सकाळ' वाचलंत का? असं म्हणा उद्यापासून!"

पण आपण तर तसं म्हणतच नाही. 'आजचा सकाळ'च म्हणतो.

मग 'वृत्तपत्र' ऐवजी आपण दुसरा काही शब्द मनात ठेवतोय का? वर्तमानपत्र? बातमीपत्र? पण हेही दोन्ही नपुं.च आहेत. एखादा पुं. शब्द आहे का? हों! आहे. 'पेपर' आज पेपर आला नाही असं म्हणतो आपण. आज वृत्तपत्र आलं नाही, असं कुठं कोण म्हणतंय? म्हणजे, 'पेपर' हा शब्द पुं. आहे, तो का? कारण 'पेपर' शब्दाचा मराठी पर्याय 'कागद' असा आहे आणि 'कागद' पुंलिंगी आहे, म्हणून 'पेपर' पुं. आहे आणि म्हणून 'सकाळ' पुं. आहे.

पहा, म्हणजे मायबोली मराठी वापरताना आपल्याला नकळत आपण कितीतरी भाषाशास्त्रीय नियम, सिद्धान्त आणि समीकरणं, उपयोजत असतो. अभावितपणे आपल्या बोलीभाषेत त्याचे पडसाद उमटलेले दिसतात. 'आमची मारुती' किंवा 'आजचा सकाळ' हे थोड्याफार फरकानं एकाच जातकुळीतले शब्द.

तात्पर्य, आठवलेकाकांना भले 'आजचा सकाळ' मागची भाषामीमांसा जाणवली नसेल, पण इथून पुढे आपण तरी प्रत्येक शब्दाच्या लिंगाकडे डोळसपणे पहायलाच हवं.

■

**'न्यासा' श्रीनाथ हर्मिटेज, सोमेश्वर वाडी, पाषाण, पुणे - ८.**








# मराठीचे अध्यापन व लेखन

मालती हळवे

'सर्वज्ञः स हि माधवः' अशा शब्दात लोकमान्य टिळकांनी ज्यांना गौरविले त्या कैलासवासी महादेव गोविंद रानडे यांच्या अथक परिश्रमाने विद्यापीठीय स्तरावर मराठी भाषेचा अभ्यास सुरू झाला. (१९०१) कुठलाही विषय विद्यापीठात अभ्यासाला गेल्याशिवाय त्याला विकासाच्या दिशा लाभत नाहीत हे न्यायमूर्ती रानडे यांनी पक्के ओळखले होते. म्हणून माजघरातील मराठी त्यांनी ओटीवर आणली; मराठीचा विकास साधला.

त्यानंतर २०व्या शतकाच्या पूर्वार्धात महाराष्ट्रात अध्यापन महाविद्यालये निघू लागली. त्या विद्यालयातून 'मराठी' हा विषय एक अध्यापनपद्धती म्हणून शिकविण्यात येऊ लागला. मराठीच्या पुत्रांना मायबोलीचे पांग फेडण्याची संधी उपलब्ध झाली. या गोष्टीला आता ७० वर्षे तरी उलटून गेली आहेत; पण पहायला जावे तर मराठीचे अध्यापन योग्य दिशेने जात आहे असे वाटत नाही. याला कारणेही अनेक आहेत.

**१) नवनवीन अध्यापनपद्धती व तंत्रांचा अभाव**

आज अध्यापनक्षेत्रात नवनवीन अध्यापनपद्धती व तंत्रे आलेली आहेत. मात्र आमची मराठीची अध्यापनपद्धती जशी असायला हवी तशी नाही. ७० वर्षांपूर्वी मराठीची अध्यापनपद्धती अगदी बाल्यावस्थेत होती. अगदी बोबडे बोल बोलणाऱ्या बालकाची स्थिती आणि अध्यापनपद्धती यात साम्य होते; परंतु आज ७० वर्षे झाली तरी मराठीची अध्यापनपद्धती तशीच रहावी याचे दुःख होते. ७०व्या वर्षी तिच्यात पूर्णता, परिपक्वता यायला हवी होती. पण तसे घडलेले नाही. नवनवीन तंत्र तिने स्वीकारलेली नाहीत. मूळचीच तंत्रे समर्थपणे वापरता येत नाहीत, मग नवनवीन तंत्र व पद्धती कोठून येणार?

**२) मानसशास्त्रीय सिद्धान्ताचा वापर न करणे**

मानसशास्त्रज्ञांनी प्रयत्नप्रमाद, अनुसंधान, अनुकरण, मर्मदृष्टिअध्ययन असे विविध अध्ययन-सिद्धान्त काढलेले आहेत. शिवाय प्रेरणासिद्धान्त आहेत. स्मृतिविस्मृतीची कारणे आहेत. मात्र ते सारे मानसशास्त्राच्या व अध्यापनशास्त्राच्या

पुस्तकातील पानांत फडफडत बसतात. त्यांचा योग्य वापर होत नाही. पाठ आराखडे म्हणजे खरे पाहता अध्यापनशास्त्राचे कृतिआराखडे आहेत. त्यात या मानसशास्त्रीय तत्त्वांचा वापर व्हायला हवा. तरच मराठीचे अध्यापन सुधारू शकते. मात्र होते काय? अजूनही ७० वर्षांपूर्वी अर्धवट ज्ञानावर तयार केलेले पाठ - आराखडे 'मागील पानावरून पुढे चालू' अशा पद्धतीने वर्षानुवर्षे अध्यापन महाविद्यालयातून चालू आहेत. कोणालाही त्या पाठ आराखड्यात सुधारणा करावी असे वाटत नाही. तशी आमच्या प्राध्यापकांची बौद्धिक पातळीही नाही. त्यांना कुठला मानसशास्त्रीय सिद्धान्त कोठे वापरावा तेच समजत नाही. आमचे मराठीचे प्राध्यापकच मराठीच्या अध्यापनाच्या अधोगतीला कारणीभूत आहेत. आमच्या मराठीच्या प्राध्यापकांमध्ये मला पुढील दोष आढळतात.

**अ) विषयप्रावीण्याचा अभाव**

आमचे मराठीचे प्राध्यापक त्यांच्या विषयात निष्णात नसतात. काहींनी प्रथमद्वितीय पदव्यांना मराठी भाषा अभ्यासलेली असते, तर काहींनी प्रथमद्वितीय पदव्यांना इतिहास, भूगोल किंवा काही अन्य विषय घेतलेले असतात. अध्यापनपदवीसाठी कमीतकमी दोन अध्यापनपद्धती निवडाव्या लागतात म्हणून त्यांनी एक मराठी अध्यापनपद्धती निवडलेली असते. त्यांना मराठी साहित्य, भाषाशास्त्र यांचे काहीकाही ज्ञान नसते.

कोणताच विषय येत नाही म्हणून कित्येकजणांनी प्रथमद्वितीय पदव्यांना मराठी विषय निवडलेला असतो. हे नेहमीच आढळते की शास्त्र, वाणिज्य शाखांना हुशार विद्यार्थी जातात. उरलेला सारा गाळ आपल्या कलामहाविद्यालयातून भरला जातो. त्यांतील हुशार विद्यार्थी अर्थशास्त्र, मानसशास्त्र, संस्कृत, इतिहास, भूगोल, हिंदी, इंग्रजी विषय घेतात. ज्यांना कोणत्याच विषयात गती नसते ते विद्यार्थी मराठी विषय घेतात. समाजाचे सर्व नवनीत वाणिज्य व शास्त्र शाखांकडे गेल्यावर आमच्या मायबोलीला कोण विचारणार?

त्यामुळेच १९६२ साली मराठीमध्ये शुद्धलेखनाचे नवे नियम आले त्या वेळी मराठीचे काय नुकसान होईल हे आमच्या प्राध्यापकांना कळले नाही. त्यांनी त्यांच्याविरुद्ध आवाज उठविला नाही, आणि मराठी बापुडी झाली. तिच्यातील सुसंगती संपली.

**ब) संस्कृत भाषेचा अनाभ्यास**

आमचे मराठीचे प्राध्यापक मराठीची जननी जी संस्कृत भाषा तिच्याशी

फटकून वागतात. संस्कृत भाषा फार अवघड आहे अशी त्यांची गैरसमजूत असते. त्यापायी त्यांची शब्दसंपत्ती थोडीशीच असते - तोकडी असते. त्यांचे मराठीचे उच्चार अशुद्ध राहतात कारण संस्कृत शिक्षणाचा अभाव. संस्कृत भाषा ही वाणीवर संस्कार करीत असते. पाणिनी या जगातील पहिल्या व्याकरणशास्त्रज्ञाने प्रथम काही केले असेल तर पुरुषांची वाणी निर्मल अशा शब्दजलांनी धुतली; अज्ञानाच्या अंधकाराचा नाश केला. म्हणून तर त्या पाणिनीला आपण नमस्कार करतो तो संस्कृत श्लोक असा -

येन धौता गिरः पुंसाम् निर्मलैः शब्दवारिभिः ।
तमश्चाज्ञानजं भिन्नं तस्मै श्रीपाणिनये नमः ॥

शिवाय संस्कृतचे जगातील सर्व भाषांशी नाते आहे. अगदी ग्रीक, लॅटिन भाषांमध्येही संस्कृत भाषेमधूनच शब्द गेलेले आहेत. भारतातील बऱ्याच भाषा संस्कृतोद्भव आहेत. अशा गीर्वाण भाषेचा अभ्यास आमचे मराठीचे प्राध्यापक, अध्यापक करीत नाहीत. मग मराठीचे अध्यापन कसे सुधारणार? 'वाण्येका समलंकरोति पुरुषं या संस्कृता धार्यते' असे एक संस्कृत वचन आहे ते उगाच नाही.

**क) इंग्रजी भाषेचे अज्ञान**

आमचे मराठीचे अध्यापक, प्राध्यापक इंग्रजीचा अभ्यास करीत नाहीत. त्यांना ती भाषा पाहिली तरी भीती (घबराट) वाटते. अशा प्राध्यापकांना इंग्रजीतील भाषाशिक्षणाची तत्त्वे, सूत्रे समजत नाहीत. आजपर्यंत मराठीच्या अध्यापनाची मी एवढी पुस्तके वाचली पण त्यात सूत्रांचा (Maxims of Teaching) चा ऊहापोह नाही. अभ्यासक्रमात ती 'सूत्रे' आहेत पण आमचे प्राध्यापक ती शिकवीतच नाहीत; वेळ मारून नेतात.

मानसशास्त्र हा सर्व शिक्षणाचा पाया. त्यातील सिद्धान्त मराठीच्या अध्यापनाच्या पुस्तकात आहेत. पण त्या सिद्धान्तातून कोणती तत्त्वे आलेली आहेत ते आमच्या मराठीच्या प्राध्यापकांना समजत नाही. इंग्रजी पुस्तके न वाचल्यांने त्या भाषेतून येणारे नवनवीन प्रवाह, त्यांना आमचे प्राध्यापक वंचित राहतात. त्यांच्या ज्ञानकक्षा रुंदावत नाहीत, त्यांची प्रगती एकांगी होते.

**ड) अभ्यासू वृत्तीचा अभाव**

आमचे मराठीचे प्राध्यापक त्यांच्या विषयाचा सखोल अभ्यास करीत नाहीत. पतंजली म्हणतो अभ्यास सतत खंड पडू न देता केला तरच ज्ञानाचे दृढीकरण होते.





अनुक्रमणिका

'स तु दीर्घकालनैरंतर्यसत्कारसेवितो दृढभूमिः ।' ही अभ्यासू वृत्ती आमच्या मराठीच्या प्राध्यापकांमध्ये अभावानेच आढळते. याचे कारणही हुशार विद्यार्थी या भाषेच्या अभ्यासाकडे वळत नाहीत हेच आहे.

यामुळेच त्यांना आपण लिहितो यात किती चुका आहेत याचा अंदाज लागत नाही. त्यांच्या एकेका वाक्यात कमीतकमी एक तर जास्तीतजास्त चार/चार चुका आढळतच असतात. हेही ते वर्षानुवर्षे जो निरीक्षण अहवाल लिहितात त्यामध्ये. रोजच्या व्यवहारातले शब्ददेखील त्यांना येत नाहीत. त्यांतील काही शब्द - शिर्षक (शीर्षक), सुत्र (सूत्र), नविन (नवीन), सोडवुन (सोडवून), मागिल (मागील), विच्यारुन (विचारून), सुवाच्च (सुवाच्य), शिकवित (शिकवीत) नमूना (नमुना), हेतूकथन (हेतुकथन), सुचना (सूचना), बक्षिस (बक्षीस)

असे आमचे प्राध्यापक! कसे येणार मराठीला चांगले दिवस!

**इ) भाषाशास्त्राचे अज्ञान**

सध्याचे भाषा अध्यापन भाषाशास्त्रावर आधारित आहे. आमच्या प्राध्यापकांना मराठीतील या भाषाशास्त्राचा पत्ताच नसतो. इंग्रजी, संस्कृत तर ते वाचीतच नाहीत. श्रवण, भाषण, वाचन व लेखन ही भाषाशास्त्रीय नियमानुसार भाषाध्यापनाची चार प्रमुख उद्दिष्टे आहेत. प्रत्येक पाठातून ती साध्य करावयाची असतात.

खरे पाहता भाषाशास्त्रीय पद्धतीने भाषा शिकवावयाची तर साहित्याला स्थान नाही. Everything old must go.' १९२१ साली एफ.एल. बिलीज् याने 'Techniques of Language Teaching' मध्ये ते स्पष्टपणे मांडलेले आहे. मात्र आमच्या भाषेचा अभ्यासक्रमात तयार करणाऱ्यांना, पुस्तककर्त्यांना त्याचा पत्ताच नाही. ते भाषाशिक्षणाची उद्दिष्टे घेतात भाषाशास्त्राकडून! आणि त्या उद्दिष्टांना गाठण्यासाठी साधनीभूत असलेले ज्ञानांश मात्र घेतात साहित्यातून. भाषाशास्त्राच्या दृष्टीने मुलांना प्रथम उच्चार, शब्द व वाक्यरचना शिकवावयाच्या असतात. आमच्या प्राध्यापकांना ते माहीत नसते. ते शब्दांचे उच्चार मुलांना शिकवीत नाहीत. मुखवाचन, अनुवाचन घेत नाहीत. श्रवणवाचन ही ग्रहणात्मक उद्दिष्टे आहेत. मुलांनी कानांनी (श्रवण) ज्ञान मिळवावयाचे आहे तसेच जिभेचा उपयोग उच्चार शिकण्यासाठी करावयाचा आहे. आमचे प्राध्यापक मुलांना मुखवाचन देत नाहीत. त्यांना इंद्रिय शिक्षण देत नाहीत. कान, नाक, डोळा, जीभ व त्वचा या पंचज्ञानेंद्रियांमार्फत व्यक्ती ज्ञान मिळवीत असते. यासाठी शिक्षकाने

पंचज्ञानेंद्रियांना शिक्षण द्यावयाचे असते. इंद्रियशिक्षण हेही एक मानसशास्त्रीय तत्त्वच आहे. पण भाषाशिक्षणात कोणतेच तत्त्व वापरावयाचे नाही या प्राध्यापकांच्या वृत्तीला काय करणार?

या भाषाशास्त्रीय अज्ञानामुळेच शिक्षक प्रतिपादनात प्रश्नांची उत्तरे विद्यार्थ्यांसाठी फळ्यावर उतरवून देत नाहीत, की आदर्श गोष्टी लिहीत नाहीत. संकलनात सारांश लेखन करीत नाहीत. वास्तविक लेखनाचे कितीतरी फायदे आहेत.

१) फलकलेखनामुळे उत्तम भाषा शिक्षक तयार होत असतो. फळ्यावर लिहावयाचे आहे म्हटले की शिक्षक जागृत होतो. तो शुद्ध लिहिण्याचा, सुवाच्य अक्षर काढण्याचा, विरामचिन्हे देण्याचा सराव करतो. संकलनात सारांश लेखन करावयाचे म्हटले की तो छोटीछोटी, सोपीसोपी, आशयगर्भ सुटसुटीत वाक्ये तयार करायला शिकतो. हे करीत असतानाच त्याला पाठ्यांश खोलवर समजतो; मुलांना प्रश्न विचारताना तो पाठ्यांश विसरत नाही. त्यासाठी पाठ्यांशात पाहून प्रश्न विचारावे लागत नाहीत.

संकलनात सारांशलेखन करण्याचे जे अनेक फायदे आहेत त्यांतील एक म्हणजे विद्यार्थिशिक्षक सारांश लेखनात तरबेज होतो. मुद्देसूद पण आशययुक्त लेखन कसे करावे ते त्याला समजते. विद्यार्थीही खूष होतात. त्यांना अभ्यास करायला, वाक्ये बनवायला कष्ट पडत नाहीत. फळ्यावरील लेखन उतरवून घेणे ही अत्यंत सोपी, सुखद अशी क्रिया आहे. त्यामुळे विद्यार्थी डोळ्यांनी व त्वचेने (हातांनी) ज्ञान मिळवितात. इंद्रियशिक्षणही तेथे मिळतेच. शिवाय डोळ्यांनी नेहमीच ८३% ज्ञान मिळत असते. कानांनी फक्त ११% ज्ञान मिळते. हातांनी ३.५%, नाकाने १.५% व जिभेने एक टक्का ज्ञान मिळते. ज्ञानसाठ्यातील १०० टक्क्यांत प्रत्येक इंद्रियाचा असा वाटा आहे. प्रत्यक्षात हे इंद्रियशिक्षण आजच्या पाठातून दिले जात नाही. फळ्यावर लिहून देणे म्हणजे विद्यार्थ्यांना चमच्यांनी भरविणे असा एक दुष्ट गैरसमज शैक्षणिक वर्तुळात ठाण मांडून बसलेला आहे. त्यामुळे लेखन या कौशल्याची पार दुर्दशा उडालेली आहे. आमच्या मराठी मुलांना मुद्दे शोधता येत नाहीत व सोप्या वाक्यातून अभिव्यक्ती करता येत नाही.

आमचे पाठआराखडे म्हणजे मानसशास्त्रीय, भाषाशास्त्रीय, तत्त्वज्ञानात्मक कसलीच बैठक नसलेले तुटले-फुटलेले, पोचे आलेले गळके भांडे आहे! कसे तयार होणार मराठी विद्यार्थी?








२) भाषेच्या दृष्टीने सर्वांत अवघड कौशल्य म्हणजे लेखन. श्रवण, भाषण, वाचन ही कौशल्ये शिकताना एवढे श्रम पडत नाहीत जेवढे की लेखन कौशल्य शिकताना, सराव करताना, त्यामध्ये प्रावीण्य मिळविताना होतात. लेखन हे ज्ञानाचे दृढीकरण करण्याचे कौशल्य आहे. मिळविलेले ज्ञान मनात खोलवर रुजविण्यासाठी लेखन कौशल्याचा फार उपयोग होतो. लेखनाचा वेग हा नेहमीच भाषण, वाचन, श्रवण यांपैकी कोणत्याही कौशल्याहून कमी असतो. त्यामुळे आशयावरून परतपरत नजर फिरते, आशय मनात घोळला जातो; शुद्धलेखन शब्दसंपत्ती, अक्षर वा वाक्यरचना सुधारतात.

३) आजच्या शिक्षणक्षेत्रात जी एवढी क्रांति झालेली आहे त्याचे कारण लेखनकलेचा शोध. लेखनकलेच्या शोधानंतर मुद्रणकलेचा पंधराव्या शतकात जो शोध लागला त्यामुळे पाठ्यपुस्तके निघू लागली. ज्ञानासाठी शिक्षकावर अवलंबून राहणे संपले, विद्यार्थी स्वतंत्र झाला. यातूनच आजच्या शिक्षणाने एवढे जगड्व्याळ रूप धारण केले आहे.

अशा या लेखन कौशल्याकडे मराठीच्या पाठांमध्ये पूर्णपणे दुर्लक्ष केले जाते. त्यामुळे मराठीचा विकास होत नाही. प्रशिक्षित शिक्षक ज्ञानानंद संपादनानंद मिळवू शकत नाहीत. आमचे लेखन फळ्यावर इयत्ता, दिनांक, विषय एखाद दुसरा परिचय करून दिलेला शब्द किंवा वाक्प्रचार यांच्यापुरतेच मर्यादित झालेले आहे. त्यामुळे मुलांना वाक्यरचनेचे, उत्तरे लिहिण्याचे, सारांश लेखनाचे, आदर्श गोष्टी, आदर्श पत्र-लेखनाचे कसले कसलेच नमुने मिळत नाहीत. अनुकरणाने शिकावयाचे तर समोर आदर्श नमुने लागतात. असे हे मराठीचे अध्यापन कोंडीत सापडले आहे. त्याला उज्ज्वल भविष्यकाल नाही - पूर्व दिव्यही नाही!

■

**२०, सुयश, बान्द्रा रेक्लमेशन, मुंबई ४०००५०.**



अनुक्रमणिका

दखलपात्र

# महाकटीण महाकर्म : मुद्रित शोधन

गीता भागवत

मुद्रित शोधक, लेखक, प्रकाशक, मुद्रक यांचे परस्पर नाते कसे असावे आणि त्या प्रत्येकाची जबाबदारी काय असावी याचा नव्याने विचार होणे जरूर आहे असे वाटते.

मी स्वतः लेखक आणि मुद्रित शोधक या दोन्ही भूमिका बरेचदा पार पाडलेल्या आहेत व दोघांचीही अनेक दुखणी मी अनुभवलेली आहेत. 'पुढच्यास ठेच, मागचा शहाणा' या न्यायाने समव्यावसायिकांना फायदा झाला तर बरा म्हणून हा लेखनप्रपंच! निर्दोष संहिता आणि संहितादुरुस्ती - विशेष करून आशयसंपादन याबद्दल बरीच चर्चा झालेली दिसते पण एका महत्त्वाच्या अंगाबद्दल म्हणजे भाषिक संपादनाबद्दल फारसे लिहिले गेले नाही. मुद्रित शोधकाच्या दृष्टीने हे भाषिक संपादन म्हणजे एक प्रचंड डोकेदुखी असते आणि ते केले तरी टीका, न केले तरी टीका अशी त्याची मृदंगवत अवस्थाही होते हा माझा अनुभव.

खरे म्हणजे मुद्रित शोधकाचे पहिले व महत्त्वाचे काम म्हणजे मूळ हस्तलिखिताबरहुकूम छपाई (अक्षरजुळणी) झाली आहे किंवा नाही हे तपासणे व जरूर त्या दुरुस्त्या करणे. मूळ लिखाणातील एखादा शब्द वा वाक्य मुद्रितात गळलेले नाही ना, परिच्छेदरचना मुळाबरहुकूम आहे ना, शुद्धलेखन, अवतरणचिन्हे, विरामचिन्हे, अक्षरवळणे व अक्षरांचे आकार-प्रकार (जाड टाइप, तिरपा टाइप अशा सूचनांप्रमाणे) यथायोग्य आहेत ना हे पाहणे हे मुद्रित शोधकाचे मुख्य, किंबहुना एकमेव काम. या कामासाठी भाषेचे मूलभूत ज्ञान, मनाची एकाग्रता व बुद्धीची तल्लखता या तिन्हींची गरज असते. अशी दहावी उत्तीर्ण झालेली व मन लावून निष्ठेने काम करणारी कुणीही व्यक्ती मुद्रित शोधक बनू शकते. लेखनाच्या गर्तीमुळे किंवा अनवधानामुळे लेखकाच्या हातून काही लेखणीप्रमाद (slip of pen) - लेखनप्रमाद नव्हे - झाले असतील तर तेदेखील दुरुस्त करून घेतले जावेत अशी माफक अपेक्षाही 'या' मुद्रित शोधकाकडून केली





अनुक्रमणिका

जाते. ती रास्तही असते. पण अलीकडे बरेचदा, लेखकाच्या भाषिक अज्ञानामुळे म्हणा किंवा बेफिकिरीमुळे म्हणा, लिहिताना झालेल्या त्याच्या शुद्धलेखनाच्या (ऱ्हस्व-दीर्घाच्या) चुका, विरामचिन्हांच्या गफलती किंवा प्रसंगी वाक्यरचनेची शिथिलता - अव्याकरणिकता या गोष्टीही मुद्रित शोधकाने दुरुस्त कराव्यात अशी उघडउघड अपेक्षा केली जाताना दिसते. खरे तर या दुरुस्त्या प्रत्यक्ष अक्षरजुळणी सुरू करण्यापूर्वी प्रकाशकाने वा लेखकाने स्वतः करणे वा करवून घेणे हा राजमार्ग. पण तसे होतेच असे नाही. भोंगळ वाक्यरचना, चुकीची विरामचिन्हे व ऱ्हस्व-दीर्घाच्या चुका शेवटी अंतिम छपाईत आढळल्या तर बेधडकपणे त्यांचे खापर 'मुद्रित शोधका'वर फोडण्याकडे केवळ समीक्षकांचा-वाचकांचाच नव्हे तर लेखकांचाही कल असतो. या वस्तुस्थितीची कल्पना असल्याने बहुतेक वेळा मुद्रित शोधक निमूटपणे या चुका दुरुस्त करण्याचा आटोकाट प्रयत्न करत असतो. पुन्हा या कामाबद्दल त्याला वेगळे मानधन जाऊ द्या, गोड शब्दांत श्रेय वा कौतुकही मिळते असे नाही हे अगदी खरे आहे.

माझाही स्वतःचा याबाबतचा अनुभव फारसा सुखद नाही. 'ज्याचं जळतं त्याला कळतं' म्हणतात ना, त्याचे प्रत्यंतर देणारा आहे. होते काय, मूळ लेखन 'साहित्य' म्हणून दर्जेदार असते. पण लेखनात दोष असतात. जसे (अ) ऱ्हस्व-दीर्घाच्या चुका (उदा. मि, परंतू, व्यथीत, निमूळता, परीणाम, परिक्षा, (ब) शब्दांचा चुकीचा, निरर्थक वा विपरीत अर्थाने वापर. उदा. (१) जिथे विशद करणे - (स्पष्ट करणे या अर्थाने) हवे तेथे 'विषद करणे' (विषद - विष देणारा) किंवा (२) 'सत्यान्वेषी' ऐवजी 'सत्यान्वेशी, (३) अर्जुनाला दिसणारा 'पक्षा'चा डोळा (पक्ष्या'चा ऐवजी) (४) 'काळजीग्रस्त आवाज' ऐवजी 'काळजीवाहू आवाज' (क) अक्षर गचाळ, वेलांट्या-कानामात्रांची गुंतागुंत-फराटे, संदिग्ध वर्णलेखन 'थ' की 'भ'? 'म' की 'य' 'ल' की 'ळ'? असे प्रश्न पाडणारे, (ड) दोन ओळींत मुळीच अंतर नाही. पुरेसा समास नाही, (इ) झेरॉक्स प्रत असल्याने काही मजकूर अस्पष्ट उमटलेला, (फ) कोपऱ्यावरील कागद फाटून अक्षरे गायब तर कधी लेखनातच अक्षरे खाल्लेली ('ऑपरेशन'ऐवजी 'ऑरेशन'), कधी स्टेपल केलेल्या कोपऱ्यात अक्षरे पिनांखाली दडलेली किंवा फाटलेली, (ग) असंख्य काकपदे, खूणचिन्हे घालून जागोजागी शब्दांची, वाक्यांची वेडीवाकडी भर घातलेली, परिच्छेदांची अनाकलनीय सरकवा-सरकवी केलेली. अशा एक ना दोन अनेक दोषांनी ओसंडणारे लेखन 'जसेच्या तसे - मुळाबरहुकूम'

छापणेच शक्य नसते. मुद्रित शोधकाला आपले कौशल्य व मनःशांती पणाला लावून अशा वेळी काम पूर्ण करून द्यावे लागते. अखेरच्या क्षणापर्यंत नवेनवे लिखाण अक्षरजुळणीला येणे, लगीनघाईसारखे मुद्रित शोधन करावे लागणे हेही बरेचदा नशिबी येते. अंतिम छपाईत काही दोष निसटून राहिले तर त्यांचा दोष सराईतपणे 'ढिसाळ मुद्रित शोधना' वर ढकलला जातो. 'शेळी जाते जिवानिशी आणि खाणारा म्हणतो वातड कशी' अशी बिचाऱ्या मुद्रित शोधकाची अवस्था होते. सुवाच्य, स्वच्छ, मुद्रणप्रतीवरून मुद्रित शोधन करण्यास लागणाऱ्या वेळापेक्षा कितीतरी अधिक वेळ व श्रम खर्च करूनही त्याला 'अपयशाचे धनी' व्हावे लागते. शंभर टक्के बिनचूक छपाईचे प्रमाणपत्र त्याला फारच क्वचित मिळते. साहजिकच आहे ते. जेवायला बसल्यावर पोटात गेलेली भाताची शिते कुणीच मोजत नाही, एखादा खडा लागला की मात्र लगेच नावे ठेवली.जातात, हे सर्वत्र लागू होणारे तत्त्व! मुद्रित शोधकाला सुवाच्य, निर्दोष मुद्रणप्रत मिळणे यापरते दुसरे सुख नसते. मुद्रित शोधनाच्या कामाच्या ओघातच व त्यासोबतच मुद्रित शोधक हे 'भाषिक' संपादन करणार असेल, करत असेल तर खरे तर त्याबद्दल त्याला थोडी अधिक बिदागी, निदान शाब्दिक दाद मिळावी अशी त्याची साहजिकच अपेक्षा असते. पण ती पुरी होतेच असे नाही.

मासिक-वृत्तपत्रांसारख्या झटपट व अल्पजीवी प्रकाशनांबाबत मुद्रित शोधकाची स्थिती वर वर्णन केल्याप्रमाणे असते, पण ग्रंथ किंवा कथा-कादंबऱ्यांची पुस्तके छापली जात असतात तेव्हा तेवढी घाईगर्दी नसते. परस्पर विचारविनिमयाला थोडी फुरसत मिळते अणि म्हणून मग अंतिम मुद्रणापूर्वी मुद्रित, लेखकाने स्वतः नजरेखालून घालण्याचा एक टप्पा पार पाडता येतो. या प्रक्रियेत, मुद्रित शोधकाने केलेल्या 'भाषिक संपादना'ला मान्यता देण्याचे काम शेवटी लेखकाकडे जाते आणि मुद्रित शोधकाने लेखकाचा हा अधिकार मान्यही करायला हवा. कारण किती झाले तरी विद्वान, भाषातज्ज्ञ मुद्रित शोधकापेक्षाही प्रतिभावान लेखकाचा मान मोठा, जनकत्वाचा असतो. त्या लेखकाला आपल्या भाषिक अज्ञानाच्या, मर्यादित भाषाकुवतीचा अंदाज असेल आणि तो पुरेसा दिलदार असेल तर बहुतेक वेळा मुद्रित शोधकाच्या भाषिक संपादनाला तो हरकत घेत नाही असा माझा अनुभव आहे. पण जर लेखकाने त्या दुरुस्त्या जाणीवपूर्वक अमान्य केल्या तर मात्र मुद्रित शोधकाने माघार घेणेच योग्य असते. कधी कधी काय होते की, लेखकही चिकित्सक भाषातज्ज्ञ असतो, आपल्या लिखाणात भाषिक-व्याकरणिक







किंवा लेखनशुद्धीचे दोष राहू नयेत असा कटाक्ष बाळगणारा असतो. मुद्रित शोधकाने त्याच्या ज्ञानानुसार केलेले बदल लेखकाला अयोग्य वाटतात. विशेषतः जुन्या-नव्या शुद्धलेखन नियमांमध्ये एकवाक्यता नसेल आणि मुद्रित शोधक व लेखक एकाच मताचे नसतील तेव्हा असा विवाद निर्माण होऊ शकतो. अशा परिस्थितीत लेखक आपल्या मतांचा आग्रह धरतो. या वेळी मुद्रित शोधकाने हटवादीपणा किंवा दुराग्रह दाखवला तर फार चमत्कारिक परिस्थिती निर्माण होते. दोघांनी प्रतिष्ठेचा प्रश्न केला तर छपाई थांबण्यापर्यंत वेळ येऊ शकते आणि कुणीतरी एकाने नमते घेणे आवश्यक होऊन बसते.

ग्रंथाच्या बिनचूकपणाची - भाषिक बिनचूकपणाची - जबाबदारीही तेथे लेखकाचीच असते. मुद्रित शोधकाला तसा खुलासा करण्याची संधीही मिळू शकते; पण लेखक काही कारणाने आपले म्हणणे त्याच्या गळी उतरवू शकला नाही किंवा बोटचेप्या राहिला तर मात्र लेखकाला मान्य नसलेले पण तरीही दुरुस्त होऊ न शकलेले काही दोष ग्रंथात राहून जातात व त्याचे परिणाम म्हणून लेखकाला प्रतिकूल शेरे सहन करावे लागतात. लेखक या नात्याने अशा कटू अनुभवाला मला सामोरे जावे लागलेले आहे. शब्द जोडून लिहावेत की तोडून (भाषा संचालक की भाषासंचालक), सामान्य रूप कसे करावे ('दर्जा'चा अधिकारी की 'दर्ज्या'चा अधिकारी), लेखनात ऱ्हस्व-दीर्घ ठरवण्यासाठी एखादे विशिष्ट नाव सामायिक शब्द मानायचे की नाही ('विधि व न्याय विभाग' की 'विधी व न्याय विभाग', 'कृषि विद्यापीठ' की 'कृषी विद्यापीठ'), ऱ्हस्व-दीर्घलेखन ('ऊहापोह' की 'उहापोह') असे वादाचे मुद्दे शेवटपर्यंत निकालात निघू न शकल्यामुळे माझ्या स्वतःच्या पुस्तकातच काही शब्दांचे लेखन मला अमान्य असलेल्या पद्धतीने झाले आहे. मुद्रित शोधकाचा अतिउत्साह किंवा वितंडवाद लेखकाला जाचक ठरू शकतो तो असा. व्यावहारिक अडचणींमुळे लेखकाने नमते घेतले तरी लेखकाचा असा अधिक्षेप मुद्रितशोधकाने न करणेच योग्य.

हे सगळे झाले भाषिक संपादनाबाबत. लेखकाच्या अज्ञानामुळे म्हणा, आळशीपणामुळे म्हणा, अनवधानामुळे म्हणा किंवा घाईगर्दीमुळे म्हणा, लेखनात आशयाच्या दृष्टीने काही दोष राहून गेले असतील व मुद्रित शोधनाच्या ओघात ते मुद्रित शोधकाच्या लक्षात आले तर त्याने ते दुरुस्त करावेत की नाही हा दुसरा महत्त्वाचा मुद्दा. चुकीचे भाषांतर, कालविसंगत उल्लेख, विपरीत शब्दयोजना अशा संहितालेखनातील आशयाच्या चुका मुद्रित शोधकाने नव्हे तर स्वतः लेखकानेच





अनुक्रमणिका

किंवा फार तर त्याच्या एखाद्या मित्राने किंवा सल्लागाराने दुरुस्त करणे योग्य असे मला वाटते. जरूर वाटली तर मानधन तत्त्वावर भाषातज्ज्ञ किंवा विषयतज्ज्ञ नेमूनही हे काम करवून घेता येते. मुद्रित शोधक हा स्वतःच भाषातज्ज्ञ किंवा संबंधित विषयातील तज्ज्ञ वा अभ्यासक असेल व त्याला आशयाच्या काही चुका खटकल्या तरी त्याने त्या परस्पर दुरुस्त करणे मात्र बरोबर ठरणार नाही. त्याचे तज्ज्ञपण लेखकाने, प्रकाशकाने, मुद्रकाने निःसंदिग्धपणे मान्य केलेले असले, तरीदेखील त्याने तसे करणे थोडे आगाऊपणाचे ठरेल. असे दोष सौजन्यपूर्वक लेखकाच्या नजरेस आणून देणे व लेखकाने मान्य केले तरच ते दुरुस्त करणे हेच योग्य. आशयात काही चुका राहून गेल्या तरी त्याची नैतिक जबाबदारी दूरान्वयानेसुद्धा मुद्रितशोधकावर टाकता येणार नाही. त्याने त्या चुका दुरुस्त कराव्यात अशी अपेक्षा लेखकाने तर करताच कामा नये. पण वाचक वा समीक्षकही तसे करणार नाहीत. इथे आणखी एक गोष्ट स्पष्ट करावयास हवी. आशयातील खटकणाऱ्या बाबी मुद्रित शोधकाने लेखकाच्या नजरेस आणावयाच्या त्या उपकारकर्त्याच्या भावनेने नाही, भलेपणाने, मित्रत्वाच्या नात्याने. त्याची भूमिका साहित्यप्रेमीची, भाषाप्रेमीची, सुहृदाची असावी. संहिता अधिक चांगली व्हावी, अधिक परिणामकारक व्हावी, आशय अधिक बिनचूक व नेमका व्हावा यासाठी स्नेहभावाने काही सूचना लेखकाला करून आपण फार मोठे परोपकाराचे पुण्य मिळवत आहोत असा अभिनिवेश मुद्रित शोधकाने मुळीच बाळगू नये. संहितेत आशयाच्या काही गफलती राहून गेल्या तर त्याचा दोष मुद्रितशोधकावर लागण्याची सुतराम शक्यता नसते हे खरे. पण म्हणून काही आशयातील दुरुस्ती हा लेखकावर उपकार ठरत नाही. आशयाच्या चुका दुरुस्त करण्यासाठी पाचपन्नास संदर्भ मुद्रितशोधकाने पाहिले, दहा ठिकाणी चर्चा केली तरी ते सगळे त्याने 'स्वान्तः सुखाय' केले असेच त्याने समजले पाहिजे. आपले स्वीकारलेले मूळ मुद्रितशोधकाने काम करता करता, सहज सुचले म्हणून हौशीने ओढवून घेतलेले 'आशय- सुधारणेचे' काम केवळ निष्काम कर्मयोग म्हणूनच त्याने करावे. त्याबद्दल वेगळी बिदागी, शाबासकी कौतुक मिळेल अशी अपेक्षा बाळगू नये, म्हणजे अपेक्षाभंगाचे दुःख होणार नाही. तत्त्वतः पाहिले तर भाषिक/आशय संपादनाचे म्हणजेच संहिताशोधनाचे व संहितासंपादनाचे काम करण्याची नैतिक जबाबदारी लेखकाची व फार तर प्रकाशकाचीच असते. जनकत्वाचा मानही मोठा आणि ओघानेच जबाबदारीही मोठी!

जाता जाता मुद्रित शोधकांना एक सूचना. मुद्रित शोधनाचे काम स्वीकारण्यापूर्वीच संहितेची झटपट शलाकापरीक्षा करणे त्यांच्या हिताचे ठरेल. संहिता सदोष असल्याचे जाणवले तर लेखकाशी सुरुवातीलाच त्याबद्दल बोलून घेतले की, नंतरचा मनस्ताप टळेल. कामच मुळात नाकारण्याचे स्वातंत्र्य मुद्रित शोधकाला केव्हाही असतेच. मात्र एकदा ते काम पत्करले की आपण त्या परिवाराचेच घटक होऊन जातो हे विसरू नये. आपले मूळ महत्त्वाचे काम मुद्रित शोधनाचे आहे हे लक्षात ठेवावे. तुम्ही आशयाच्या शंभर चुका योग्य पद्धतीने दुरुस्त केल्यात आणि मुद्रित शोधनाच्या चार जरी चुका तुमच्या नजरेतून निसटल्या तर तुम्हांला कुणी क्षमा करणार नाही. कारण मुळामध्ये तुम्ही सहायक/मदतनीस असता मुद्रकाचे, अक्षरजुळणीकाराचे; लेखकाचे वा प्रकाशकाचे नव्हे.

एकूण महाकठीण महाकर्म जे मुद्रित शोधन ते महानिष्ठेने व महाचिकाटीने पार पाडले तरच महाआनंदाचा महालाभ होईल हे निश्चित.

■

**(मूळ प्रसिद्धी : 'लोकरंग पुरवणी' 'लोकसत्ता', २४ ऑक्टोबर, १९९९)**

**९, रानडे कॉटेज, परांजपे 'बी' स्कीम, तिसरा रस्ता, हनुमान रोड, विलेपार्ले (पूर्व)**
**मुंबई - ४०००५७. दूरध्वनी ८३६०७७३**











# राष्ट्रीय साक्षरता मिशन

**श्याम विमल**

*[श्याम विमल शर्मा हे पंजाबी भाषक लेखक वाचकांना परिचित आहेतच. त्यांच्या मराठीतून प्रसिद्ध होणाऱ्या कवितांवरून त्यांचे मराठी भाषेवरील प्रेमच दिसून येते. - संपादक]*

शाळेतल्या जमिनीवर बसला
तो गरीब मुलगा
दौतीत लेखणी बुडवतो नि
वहीत लिहितो
'रोटी'
शाईचा बुंद पडल्यामुळे विरघळून जाते
रोटी
मुलगा जमिनीवरून चिमूटभर उचलतो
धूळ
विरघळलेल्या रोटीवर मांडतो
रोटी धुळकट होऊन जाते
शिक्षक अनुभवतो
मुलगा उन्नति करीत आहे
आई समजते
बाळ भुकेला आहे
बापाला वाटते
पोरगा कमावता होऊ जातोय्
सरकारला कळले
मुलगा साक्षर झालाय.
मुलाला पण कळतच नाही
'रोटी' यापुढे लिहायचे काय?
तो फक्त बोलणं जाणतो
आई ...... भूक .......
जेव्हा मुलाला बोलण्या-लिहिण्याशिवाय
बाकीच्या क्रिया समजून पडतील
आणि तो मुलगा
इच्छा प्रकट करील तोपर्यन्त
देश
त्याच्या वयात येण्याची वाट पाहील.

■

**विमल वाटिका, बी-१६, सेक्टर २६, नोएडा (उ.प्र.) - २०१ ३०१.**



अनुक्रमणिका







# महाराष्ट्र व कर्नाटक : भाषा आणि संस्कृती

गो. म. कुलकर्णी

*[मराठीतील प्रसिद्ध समीक्षक प्रा. गो. म. कुलकर्णी यांचे दि. १ एप्रिल, २००१ रोजी पुणे येथे निधन झाले. त्यांनी प्रामुख्याने समाजशास्त्रीय समीक्षा पद्धती अवलंबिली होती. त्यामुळे साहित्यसमीक्षा विचाराइतकाच भाषा व संस्कृती यांच्या अनुबंधाचा विचारही त्यांच्या आस्थेचा प्रांत होता. कर्नाटक राज्य मराठी साहित्य परिषदेच्या वतीने दि. १२ व १३ डिसेंबर १९९३ला गुलबर्गा येथे दुसरे कर्नाटक राज्य साहित्य संमेलन झाले होते. या संमेलनाच्या अध्यक्षपदावरून केलेले प्रा. गो. म. कुलकर्णी यांचे भाषण महाराष्ट्र व कर्नाटक यांतील भाषा व संस्कृती संबंधाने विचारमंथन करणारे असल्याने येथे देत आहोत. - संपादक]*

कर्नाटक राज्य मराठी साहित्य परिषदेचे पहिले अधिवेशन सुप्रसिद्ध मराठी कवयित्री, श्रीमती इंदिरा संत यांच्या अध्यक्षतेखाली, १९९० मध्ये गदग येथे संपन्न झाले आणि त्यानंतर या परिषदेचे हे दुसरे अधिवेशन आज सुमारे तीन वर्षांनी गुलबर्गा येथे भरत आहे. या अतिमहत्त्वाच्या संमेलनाचे अध्यक्षपद देऊन आपण माझा जो सन्मान करीत आहात त्याबद्दल मी आपला अतिशय आभारी आहे. आपण ज्या विशिष्ट ध्येयवादाने प्रेरित होऊन प्रस्तुत संमेलनाची उभारणी केली आहे, ती लक्षात घेता, या संमेलनाचे अध्यक्षपद स्वीकारण्याचा आपल्याला कितपत अधिकार आहे? असा प्रश्न, आपले या संदर्भात, जेव्हा आमंत्रण आले, त्या वेळी माझ्या मनात उपस्थित झाला. त्याचे उत्तर अर्थातच नकारात्मक होते. पण प्रस्तुत संमेलन गुलबर्ग्याच्या ज्या मराठी-मंडळातर्फे भरत आहे, त्या मंडळाचा व माझा दीर्घकाळचा केवळ 'अनुबंधच' नव्हे तर जो ऋणानुबंध आहे, त्याचे स्मरण होताच, अधिक विचार न करता, हे आमंत्रण म्हणजे आपली प्रेमाची एक आज्ञा आहे, हे जाणून तिचा स्वीकार करीत आहे.

प्रस्तुतचे आमंत्रण स्वीकारण्याचे आणखी एक महत्त्वाचे कारण म्हणजे मी महाराष्ट्राच्या ज्या परिसरात जन्मलो, ज्या परिसराच्या कटिखांद्यावर खेळलो-वाढलो, तो परिसर, महाराष्ट्र-कर्नाटकाच्या सरहद्दीचा भाग आहे. यामुळे

लहानपणापासून मराठी बरोबर कन्नड भाषेशीही माझा संबंध आला आहे. माझ्या बहुतेक बालमित्रांची मातृभाषा कन्नड आहे, मंगसुळीचा खंडोबा, हे जे आमचे कुलदैवत, ते कर्नाटक महाराष्ट्राच्या सीमारेषेवरच आहे. सांगली येथील विलिंग्डन महाविद्यालयात शिकत असता, डॉ. व्ही. के. गोकाक व डॉ. रं. श्री. मुगळी या सारख्या थोर कन्नड साहित्यिकांचा विद्यार्थी असण्याचे भाग्य मला लाभले आहे, आणि मराठीच्या अध्यापनाच्या निमित्ताने मी दोन-अडीच तपे, विजापुरात वास्तव्य केले आहे; या अनुषंगाने बेळगाव, धारवाड, बेंगलूर यांसारख्या कर्नाटकातील शहरांचा स्पर्श मला झाला आहे, आणि तेथील कन्नड-मराठी संस्कृतीचा, थोडा-फार अनुभवही मी घेतला आहे.

यामुळे कर्नाटक-महाराष्ट्र यांच्या सांस्कृतिक संबंधाबाबतचे विचार, माझ्या मनात नेहमीच घोळत असतात. त्यांना वाच्यरूप देण्याची एक दुर्मिळ संधी, म्हणून मी आपल्या या आमंत्रणाचा नम्रतापूर्वक स्वीकार करीत आहे.

कर्नाटक-महाराष्ट्राच्या, अनादी कालापासून चालत आलेल्या मूलात्मस्वरूपाच्या विविध स्नेहग्रंथी आहेत, त्या आज थोड्याफार सैल झाल्यासारख्या वाटत असल्या, काही प्रमाणात त्यांची आज रस्सीखेच चाललेली असली तरी, ती तात्पुरती, अल्पकाळापुरती आहे, आज ना उद्या या दोन उपसंस्कृतींचे मूलात्म ऐक्य प्रस्थापित झाल्याशिवाय राहणार नाही, असा माझा दृढ विश्वास आहे. आपलीही भावना हीच असणार आणि म्हणूनच आपण गुलबर्गा, गदग, हुबळी, धारवाड, बीदर, होळासमुद्र अशा निरनिराळ्या ठिकाणी 'कर्नाटक राज्य मराठी साहित्यपरिषदे'च्या शाखा स्थापन केलेल्या आहेत. या शाखासंख्येत भर पडत जावी, असा आंपला प्रयत्न आहे. या कार्यवृद्धीच्या अनुरोधानेच विचारविनिमय करण्यासाठी, आपण आज गुलबर्ग्यात जमलेले आहात. 'आंतरभारती'चे स्वप्न समोर ठेवून या कार्याचा शुभारंभ मागेच आपण गुलबर्ग्यात केला आहे. गेली चौदा - पंधरा वर्षे 'अनुबंध' सारखे त्रैमासिक आपण चालवीत आहात, या कार्याची धुरा, प्रा. भाऊसाहेब देऊळगावकर आणि डॉ. चंद्रशेखर कपाळे, हरिभाऊ रेणापूरकर, प्रा. परचुरे यांनी समर्थपणे सांभाळली आहे आणि त्याला प्रा. केशवराव महागावकर, प्रा. वसंतराव कुलकर्णी, प्रा. भालचंद्रराव शिंदे, प्रा. व्यंकटेश वळसंगकर, विद्याधर मुरुगकर यांसारख्यांची समर्थसाथ लाभली आहे. या भूमीचा गुणच असा आहे की, पूर्वापार कालापासून गुलबर्गा हे एकप्रकारे आंतरभारतीचे केंद्र बनून राहिले आहे. कन्नड, मराठी, हिंदी, उर्दू, तेलगू या भाषा



अनुक्रमणिका






येथे हातात हात घालून शतकानुशके नांदत आल्या आहेत. भाषाभाषांत तशी तेढ नव्हती, एकाच घरात मराठी व कानडी दोन्हीही भाषा सराईतपणे बोलणारी कुटुंबे होती, अजूनही काही कुटुंबे तशी असतील. आजही डॉ. भीमाशंकर देशपांडे यांचे मराठी संशोधनकार्य या भागात चालू आहे. रामदासांच्या साहित्याचे उर्दू व कन्नड अनुवाद येथेच प्रथम झाले. दसऱ्याला सोने वाटण्याची महाराष्ट्रातील पद्धतीही येथे रूढ आहे. कर्नाटकाच्या इतर भागांत ती नाही. बेंदूर किंवा पोळा हा सणही गुलबर्गा भागात साजरा होतो. असे असूनही पूर्वी नसलेले कन्नड-मराठी भाषेतील ताण - तणाव येथे जाणवू लागले आहेत. दोन भाषकांत आज एक प्रकारचे द्वैत निर्माण झाले आहे. स्वातंत्र्यकाळात तीत वाढच झाली आहे. कर्नाटक प्रांतात कन्नड भाषेस प्राधान्य असावे, हे तत्त्व मराठी माणसाला मान्य आहे, पण त्याचबरोबर मराठी मातृभाषेतून शिक्षण मिळण्याची व मराठी भाषकांच्या इतर सांस्कृतिक सुविधांवर गदा येऊ नये अशी त्याची मनोमन इच्छा आहे.

या दुःस्थितीची सर्वाधिक झळ जर कुणाला लागत असेल तर ती, पूर्वीच्या निजामी राजवटीतून कर्नाटकात सामील झालेल्या गुलबर्गा व बीदर, या प्रांतातील मराठी जनतेला. या दोन्ही प्रांतांत मराठी भाषकांची संख्या खूपच मोठी आहे. पिढ्यानपिढ्या त्यांचे या प्रांतात वास्तव्य आहे. निजामी राजवटीत सर्वच क्षेत्रांत उर्दूचे विलक्षण प्राबल्य होते. निजामी मुलखात राहणाऱ्या सर्व तेलगू, कन्नड, मराठी भाषकांवर सक्तीने लादली जात होती. यामुळे ज्यांची मातृभाषा उर्दू नाही, अशा सर्व भाषकसमूहांना स्वभाषा व स्वसंस्कृती यांपासून वंचित राहावे लागत असे.

या वंचनेतून मुक्त होण्यासाठी मराठी व अन्य भाषकांनी निजामी राजवटीविरुद्ध तीव्र लढा दिला, हालअपेष्टा सहन केल्या, तुरुंगवासही पत्करला आणि एकदाची मुक्तता मिळविली, सुटकेचा निःश्वास सोडला, आणि आता तरी आपल्या भाषेला व संस्कृतीला बरे दिवस येतील, अशी सुखस्वप्ने पाहिली. पण निजामी राजवटीतून नव्याने मुक्त झालेले आणि कर्नाटकप्रांतात नव्याने समाविष्ट झालेले गुलबर्गा, बीदर हे जिल्हे आणि जेथे मराठी भाषा व संस्कृती यांचे पूर्वकालापासून मोठ्या प्रमाणात वास्तव्य आहे असे बेळगाव, धारवाड, कारवार, विजापूर सारखे जिल्हे, जेव्हा कर्नाटक, राज्यात सामील झाले, त्या जिल्ह्यांतर्हही अवैध, सूक्तासूक्त मार्गाने मराठीवर कन्नडचे आक्रमण होत असल्याचा कटु अनुभव येत आहे. याची कथा व व्यथा गदग येथे भरलेल्या या संमेलनाच्या पहिल्या अध्यक्षा, श्रीमती इंदिरा संत यांनी आपल्या भाषणातून परखडपणे यापूर्वी बोलून दाखविली





अनुक्रमणिका

आहेच, पण याबाबतच्या अन्यायांचे निराकरण होण्याचे मार्ग अद्यापि तरी अवलंबिले गेलेले नाहीत.

भारत देश स्वतंत्र होऊन आता जवळ जवळ अर्धशतक होत आले आहे. आपण स्वतंत्र भारताची जी घटना बनविली आहे, ती लोकशाही स्वरूपाची आहे. तीत स्वातंत्र्य-समता आणि बंधुता या मूल्यत्रयीला अग्रस्थान आहे. या मूल्यत्रयीचे यथायोग्य वितरण व्हावे, यासाठीच भाषावार प्रांतरचनेच्या तत्त्वाचा आपण स्वीकार करून हे तत्त्व कार्यवाहीत आणण्याचा प्रयत्न चालविला आहे, भारतातील प्रत्येक भाषकाला किंवा भाषिक गटाला, स्वभाषेच्या माध्यमातून स्वतःचा व पर्यायाने सर्व भारताचा सर्वांगीण विकास साधावयाचा आहे. हे मूलभूत तत्त्व कार्यकर होण्याच्या दृष्टीने विविध भाषांच्या संदर्भात, 'साहित्य अकादमी', 'नॅशनल बुक ट्रस्ट' यांसारखे काही उपक्रमही कार्यवाहीत आणले गेले आहेत. समाजाला साक्षर करण्यास, त्या दृष्टीने नवी पाठ्यपुस्तके निर्माण करण्यास, प्रारंभही झाला आहे. साहित्य- संस्कृती मंडळाची स्थापना, लेखकांना दिले जाणारे पुरस्कार, विविध अनुदाने, प्रादेशिक विद्यापीठांची निर्मिती, इत्यादींना चालना देण्याचे जे उपक्रम होत आहेत ते, याच उद्देशाने.

पण खेदाची गोष्ट अशी की, या बाबतीत आपण केलेल्या प्रतिज्ञा आणि त्यांची फलश्रुती, यांचा साकल्याने विचार करता, अपेक्षित यश आपल्या वाट्याला आलेले नाही. भाषा, प्रांत, धर्म, जात इत्यादी भेद विसरून ज्या, एकात्म भावनेने आपण स्वातंत्र्यप्राप्तीसाठी लढा दिला, त्या भावनेला स्वातंत्र्योत्तर काळात तडा गेला आहे. धार्मिकता, जातीयता, प्रांतिकता, स्वार्थलोलुपता, सत्ताभिलाषा, भाषिक दुराभिमान इत्यादींनी आज आपल्याला ग्रासून टाकलेले आहे. 'हेची फळ काय मम तपाला?' असे वारंवार म्हणण्याचे प्रसंग आपल्यावर गुजरत आहेत. साऱ्याच क्षेत्रांतील सारेच दीप मालवले गेले आहेत, असे नव्हे. पण ते मंदावत चालले आहेत. दिशाहीन झाल्यासारखे, कोंडीत सापडल्यासारखे आपल्याला वाटत आहे. असे होण्याला अनेक कारणे आहेत. त्यांतील एक महत्त्वाचे कारण, स्वातंत्र्यासाठी एकत्र येऊन आपण जो लढा दिला, त्या लढ्याच्या काळात किंवा त्यानंतरही स्वातंत्र्योत्तर काळात आपण कोणते ध्येय स्वीकारणार आहोत, कोणती भाषिक, भौतिक व सांस्कृतिक उद्दिष्टये सिद्धीस नेणार आहोत, याचा निश्चित नकाशा आपल्यासमोर नव्हता. लोकशाहीचे सुंदर स्वप्न आपल्यासमोर होते पण ते वास्तवात तितक्याच सुंदरपणे साकार कसे होईल, याचा विधायक दिशेने स्वातंत्र्यपूर्व काळात फारसा विचार झालेला नव्हता,











जो काही विचार झाला होता, तो फार पुस्तकी, औपचारिक स्वरूपाचा होता. त्याला जीवनवास्तवाची, सखोल चिंतनाची जोड मिळाली नव्हती, हे सारे आपण कालौघावर सोपवलेले होते, आणि स्वातंत्र्यप्राप्तीनंतरही आपण या वस्तुस्थितीचा सर्वांगीण, सखोल विचार केलेला नाही. भारतासारख्या बहुभाषक देशाला आपले भाषाविषयक प्रश्न सोडवावयाचे असतील, तर भाषाविषयक धोरणांचा मूलात्म पध्दतीने विचार करण्याची नितांत गरज आहे. त्यासाठी विविध अंगांनी विचार करावा लागेल. कारण, भारतातील कोणताही प्रदेश घेतला तरी तेथे राष्ट्रभाषा म्हणून हिंदीचा, उच्च ज्ञानभाषा म्हणून इंग्रजीचा, ज्या प्रांतात आपण राहतो, त्या प्रांतभाषेचा, त्या प्रांतात राहणाऱ्या, पण ज्यांची मातृभाषा वेगळी आहे, त्या भाषक समूहाचा, आपली प्राचीन धर्मपरंपरा समजून घेण्याच्या संदर्भात संस्कृतचा, या सर्वांचा समन्वय कसा साधावयाचा, हा एक यक्ष प्रश्न बनून राहिलेला आहे. त्याकडे आपले जावे तेवढे लक्ष गेलेले नाही. (एवढे कशाला, स्वभाषेच्या विकासासाठी व्हावा तेवढा सखोल विचार झालेला नाही) हे स्पष्ट होण्याच्या दृष्टीने खुद्द महाराष्ट्राचेच आपण उदाहरण घेऊ. महाराष्ट्राने भाषावार प्रांतरचनेसाठी, संयुक्त महाराष्ट्राची चळवळ उभी केली. प्रसंगोपात त्यासाठी रक्तही सांडले. संयुक्त महाराष्ट्रनिर्मिती होऊनही - काही जुजबी उपक्रम वगळता (साहित्य संस्कृती मंडळाची स्थापना, विश्वकोशनिर्मिती) महाराष्ट्र शासनाकडून भाषा व साहित्य यांच्या विकासाचे ध्येय उराशी बाळगणाऱ्या महाराष्ट्रातील विविध संस्थांकडून काही योजनाबद्ध आश्वासक हालचाली होत असल्याचे दिसत नाही आणि ज्या होत आहेत, त्या अद्यापि, तरी औपचारिक पातळीवरच वावरत आहेत. मध्य महाराष्ट्र व विदर्भ, नागपूर, मराठवाडा, खानदेश, कोकण या सर्वांना कवेत घेऊन सर्वांना प्रेरक-पोषक ठरतील, असे किती भाषिक - सांस्कृतिक उपक्रम आपण संयुक्त महाराष्ट्र निर्मितीनंतर हाती घेतले, त्यांची फलश्रुती काय? या प्रश्नाचा आपण अंतर्मुखवृत्तीने विचार केलेला नाही, जगातील सर्व प्रकारची ज्ञानभांडारे उघडी होऊन त्याद्वारा मराठी भाषा संपन्न करण्याचे योजनाबद्ध कार्यक्रम आपण अमलात आणलेले नाहीत, विश्वविद्यालयांच्या संख्येत तशी भर पडलेली आहे; पण या विश्वविद्यालयातील विविध ज्ञानशाखांचा आणि मराठीच्या कितपत सखोल आणि समृद्ध स्वरूपाचा संबंध साधता आला आहे? खुद्द विश्वविद्यालयातील मराठीच्या अभ्यास पद्धतीत बदललेल्या सांस्कृतिक स्थितिगतीचा विचार करून मराठीचा अभ्यासक्रम सशक्त करण्याचे महाराष्ट्रात किती प्रमाणात सखोल आणि सर्वांगीण प्रयत्न झाले आहेत? या प्रश्नांचा विचार

करता, त्यांची उत्तरे जवळजवळ नकारात्मक आहेत. कर्नाटकात मराठीची उपेक्षा होते, अशी आपण तक्रार करता, कन्नड-शासनाला या उपेक्षेबद्दल आपण जबाबदार धरता, ते रास्तही आहे. पण मराठीशासन असलेल्या महाराष्ट्रात मराठी भाषेची जी उपेक्षा चालली आहे, तीबद्दल आम्ही कोणाकडे दाद मागावी? याला जबाबदार कोण? महाराष्ट्रातील शासनव्यवस्था, की महाराष्ट्रातील विचारवंत मानली जाणारी मंडळी?

महाराष्ट्रातच काय, पण भारतातील कोणत्याही भागात आपण गेलो तरी, आपण देहाने जरी स्वतंत्र झालेले असलो तरी मनाने पारतंत्र्यकालातील वृत्तीचेच राहिले आहोत. आम्हांला पुष्किन माहीत असतो, पण पुरंदरदास कोण होता, याचा पत्ता नसतो! आपण स्वतःला 'लोकशाहीवादी' म्हणवतो खरे. पण लोकशाहीचे, लोकसंस्कृतीशी आणि लोकभाषेशी जिव्हाळ्याचे नाते असते, याचे पुरेसे भान आपल्याला आलेले नाही. या स्वातंत्र्योत्तर काळात वैध - अवैध मार्गाने सत्ता संपादन करणे आणि तिचा निरंकुशपणे उपभोग घेणे, हाच प्रधान जीवनव्यवहार बनला आहे आणि त्यासाठी भाषा, प्रांत, धर्मभावना यांसारख्या घटकांचे वैध-अवैध पद्धतीने उपयोजन होऊ लागले आहे. मूळ प्रश्नांना बगल देण्याची प्रवृत्ती बळावत चालली आहे. कर्नाटक - महाराष्ट्रातील ताणतणावांचे हे एक प्रमुख कारण आहे.

हीच प्रक्रिया, उलट दिशेने महाराष्ट्रातही चालू आहे. महाराष्ट्र प्रांतात राहणाऱ्या कन्नड भाषक विद्यार्थ्यांवर मराठीची सक्ती व्हावी असा आग्रह धरला जात आहे. स्वातंत्र्यपूर्वकाळात महाराष्ट्रातील कन्नड-मराठीच्या सरहद्दीवरील भागातील (सोलापूर, कोल्हापूर, सांगली इ.) महाविद्यालयांत कन्नड भाषेच्या अध्ययन- अध्यापनाची सोय होती, ती आज बव्हंशी लुप्त झाली आहे. असे प्रकार महाराष्ट्रात होऊ नयेत, कर्नाटकातील महाराष्ट्रीयांना ज्या सुविधा प्राप्त होण्याची गरज आहे, त्या सर्व सुविधा महाराष्ट्रातील कन्नड भाषकांनाही प्राप्त व्हाव्यात. कर्नाटक-महाराष्ट्रातील दूरदर्शनवर किंवा नभोवाणीवर मराठीला व कन्नडला योग्य ते प्रतिनिधित्व मिळावे, असे मराठी भाषकांचे म्हणणे आहे. कर्नाटकात आणि महाराष्ट्रात जशी उर्दू अकादमी स्थापन झाली आहे, तशी कर्नाटकात मराठी व महाराष्ट्रात कन्नड अकादमी स्थापन व्हावी, दोन्ही भाषांच्या अभ्यासाच्या सुविधा दोन्ही प्रांतांत निर्माण व्हाव्यात, अशी त्यांची तळमळीची मागणी आहे. कारण ही मागणी न्याय्य आहे आणि या मागणीची परिपूर्ती झाल्यास, ती उभय प्रांतांतील सांस्कृतिक संवादाला, विकासाला परिपोषक होईल. या मुद्द्याबद्दल कुणाचाच

तात्त्विक मतभेद असणार नाही, प्रश्न निर्माण होतो तो या बाबतीत अवलंबावयाच्या मार्गाबद्दल. दोन्ही प्रांतांत या बाबतीत जनमानसांत जागृती घडवून आणून शासकीय पातळीवरून हा प्रश्न सोडविण्याचा प्रयत्न करावा, असे उत्तर, सकृत्दर्शनीच कुणाच्याही मनात येणारे आहे. ते योग्यही आहे; या मार्गाचा जमेल तेवढा अवलंब जरूर करावा, पण एवढ्याने आपला कार्यभाग सिद्धीस जाईल असे वाटत नाही; तसा आजवरचा अनुभवही नाही; यासाठी याबाबत जनमनांतच जागृती घडवून आणणे नितांत गरजेचे वाटते.

कारण, ज्याला आपण सर्वसामान्य नागरिक म्हणतो, तोच वस्तुतः त्या त्या संस्कृतीचा सावयवी घटक असतो. जिला आपण 'संस्कृती' 'संस्कृती' असे संबोधता, ती जरी काही प्रमाणात भौतिक स्वरूपात, डोळ्यांना दिसत असली तरी, ती मनोमयसृष्टीशी संबंधित असते. ही संस्कृती समाजाची असो वा व्यक्तीची, ती मुख्यतः साकारते ती व्यक्ती मनात, व्यक्तिमनाच्या माध्यमातूनच ती पुढे समाजमनात संक्रांत होते. यासाठी व्यक्तिमने जसजशी जागृत होत जातील, तसतसा आपला या बाबतीतला कार्यभाग प्रभावीपणे सिद्धीस जाईल.

हे घडून कसे आणावयाचे? त्याचांही आपण विचार केला पाहिजे, मार्ग शोधले पाहिजेत, हे मार्ग जसे बाह्यस्वरूपाचे पाहिजेत, तसे हृदयपरिवर्तनात्मक स्वरूपाचेही हवेत. किंबहुना अग्रक्रम द्यावयास हवा, तो हृदयशुद्धीच्या, हृदयसंवादाच्या मार्गाला. सर्वांत सोपा, सर्वोपलब्ध, सर्वप्रभावी मार्ग म्हणजे साहित्यमार्ग. या मार्गाचा अवलंब करूनच पूर्वकालीन साधुसंतांनी भारतीय संस्कृतीच्या एकात्मतेचे भरणपोषण केले. नामदेवांसारखा दक्षिणेककडील संत, उत्तरेकडील संतांशी, पंजाबशी हृदयसंवाद साधू शकला, तो या साहित्यमार्गाच्या बळावरच. हे माध्यम इतके प्रभावी असते की, त्यामुळे शत्रुत्वाचे रूपांतर मैत्रीत होऊ शकते. इंग्रजांचे व आपले राजकीय क्षेत्रात भांडण असूनही पारतंत्र्यकाळातच आपण शेक्सपीअरला डोक्यावर घेऊन नाचलो. आगरकरांसारख्या कट्टर देशभक्ताला तुरुंगवासाच्या खडतर काळातही शेक्सपीअरच्या 'हॅम्लेट'चा अनुवाद करावा, असे वाटले.

नाना धर्म, नाना भाषा, नाना पोटसंस्कृती यांनी गजबजलेल्या या देशात भारताच्या आंतरिक एकात्मतेचा धागा कायम ठेवावयाचा असेल, एवढेच नव्हे तर तो वृद्धिंगत करावयाचा असेल, तर त्याला 'शब्द' हेच सर्वाधिक महत्त्वाचे माध्यम आहे. शब्दांची ही महती अनुभवल्यामुळेच तुकारामासारखा संत,

'आम्हां घरीं धन शब्दांचीच रत्ने । शब्दांचीच शस्त्रे यत्न करू ।

शब्दची आमुच्या जीवींचें जीवन । शब्दें वाटूं धन जनलोकां ।
तुका म्हणे पाहा शब्दची हा देव । शब्देंचि गौरव पूजा करूं ।

असे शब्दांबद्दलचे, साहित्याबद्दलचे उद्गार काढतो. मात्र याबाबत एकच, महत्त्वाची अट आहे, आणि ती म्हणजे ही शब्दोपासना किंवा साहित्योपासना व्रताचारी वृत्तीतून जन्माला येण्याची. या व्रताचारी वृत्तीने जर आपण साहित्यमार्गाची कास धरली, तर आपल्या मूळ उद्दिष्टाची परिपूर्ती होण्यास फार मोठे साह्य होईल. याच्या प्रत्यंतरासाठी आपल्याला फार दूर जावयास नको, आजच्या कर्नाटक- महाराष्ट्र संदर्भात निरनिराळ्या प्रकारचे तणाव निर्माण झालेले असूनही गिरीश कर्नाड, शिवराम कारंत, भैरप्पा, शांतिनाथ देसाई प्रभृतींच्या अलीकडेच मराठीत अनुवादित झालेल्या साहित्याचे आपण मनापासून स्वागत करतो, कौतुक करतो. आजच्या मराठी कादंबरीपेक्षा आजची कन्नड कादंबरी अधिक वरच्या दर्जाची आहे, हे मोकळेपणाने मान्य करतो, मराठीतील एक मान्यवर लेखक पु.ल. देशपांडे यांच्या विनोदी साहित्याचा कन्नडमध्ये नुकताच जो अनुवाद झाला आहे, त्याचे कन्नड भाषकांनी खूप कौतुक चालविले आहे, असे या अनुवादाचे एक कर्ते, कन्नड-मराठीचे एक थोर अभिज्ञ, डॉ. अ.रा. तोरो यांनी मला सांगितले, हे केवढे सुचिन्ह आहे. मूळ कर्नाटकचे रहिवाशी भीमसेन जोशी, कुमार गंधर्व, गंगूबाई हनगळ, बसवराज राजगुरू, मल्लिकार्जुन मन्सूर यांसारख्या गानक्षेत्रातील बुजुर्ग मंडळींचे आपण कौतुक करीत आलो आहोत, याची या प्रसंगी आठवण करून द्यावीशी वाटते. साहित्य वा साहित्येतर कला, कोणत्या प्रकारची किमया करू शकतात, याची यावरून कल्पना यावी. अलीकडेच पुण्यात स्थापन झालेल्या 'कन्नड मराठी स्नेहवर्धक मंडळा' ने पुण्यातील कन्नड आणि मराठी भाषकांत अगदी अल्पावधीत सौहार्द निर्माण केल्याचे मी अनुभवीत आहे.

आज आपण येथे जमलेले सर्वचजण, आपापल्या परीने व आपल्या पद्धतीने, या महोदर सारस्वताचेच नम्र उपासक आहोत, आपण सर्वांनी मनात आणल्यास आणि एकजुटीने मनापासून प्रयत्न केल्यास, कन्नड-मराठी संदर्भात निर्माण झालेले 'दुरितांचे तिमिर' नष्ट होऊन आत्मविकासाचा सूर्य उदित होईल, यात शंका नाही. आपण सारे भारतीय कोणत्या तरी भारतीय उपसंस्कृतीचीच अपत्ये आहोत. भारतीय संस्कृतीच्या सर्वांगीण विकासाचा गौरीशंकर आपल्याला गाठावयाचा आहे. तो गाठण्यासाठी स्वसंस्कृतीचा व स्वतःच्या शेजारी नांदणाऱ्या उपसंस्कृतीचा परस्परस्नेहबंध कसा विकसित होईल, हे पाहण्याची आज नितांत गरज आहे.










या दृष्टीने विचार करता, कन्नड-मराठी नाते दृढ करणे तर आवश्यक आहेच, पण ते एक प्रकारे सुलभ आणि सोपेही आहे. कारण, या दोन्ही उपसंस्कृती, एकाच मूळ संस्कृतीच्या दोन बाजू आहेत, किंवा एकाच संस्कृतीची दोन उपांगे आहेत, अशी इतिहासाची साक्ष आहे. पण याचे आपल्याला असावे तेवढे भान नाही. कन्नड भाषा ही मराठी भाषेपेक्षा वयाने ज्येष्ठ आहे, तिचे काही संस्कार मराठी भाषेवर झालेले आहेत, ही वस्तुस्थिती आहे. परंतु कन्नड संस्कृती ही केवळ द्रविडांची आहे, आणि मराठी संस्कृती आर्योद्भव आहे म्हणजेच ती कन्नड संस्कृतीहून श्रेष्ठ आहे, असाच ग्रह बऱ्याच कालच्या व आजच्या सुशिक्षित मराठी माणसांच्या मनातही ठाण मांडून बसला आहे. यामुळे मराठी भाषेत काही कन्नड शब्द, काही कन्नड भाषाप्रयोग रुजलेले आहेत, 'ज्ञानेश्वरी' सारख्या ग्रंथात काही कन्नड शब्द आढळतात, महाराष्ट्रातील अनेक खेड्यांच्या नावांची उपपत्ती द्रविडभाषेशी संबद्ध आहे, असे कोणी सुचविल्यास, सांगितल्यास मराठी भाषेच्या कडव्या अभिमान्याला धक्का बसतो, तो अस्वस्थ होतो, याची प्रचीती, शं.बा. जोशी यांच्या 'मऱ्हाटी संस्कृती' या ग्रंथाच्या बाबतीत, किंवा विश्वनाथ खैरे यांच्या या संदर्भातील काही विधानांच्या संदर्भात, महाराष्ट्रात केवढा गदारोळ माजला होता, याची आपल्यापैकी अनेकांना कल्पना असेलच. कर्नाटक-महाराष्ट्राच्या पूर्वसंस्कृतीचा इतिहास-भूगोल योग्य प्रकारे समजून घेण्याची किती नितांत गरज आहे, याची यावरून कल्पना यावी.

कर्नाटक आणि महाराष्ट्र ही भौगोलिकदृष्ट्या तर एकाच भूखंडाची अपत्ये आहेतच, एवढेच नव्हे तर राजकीयदृष्ट्याही हे भूभाग दीर्घकाल एकाच छत्राखाली नांदत होते. इ.स.च्या पहिल्या शतकापासून पंधराव्या-सोळाव्या शतकापर्यंत ज्या विविध राजवटी (सातवाहन, कदंब, चालुक्य, राष्ट्रकूट, होयसळ, यादव, मुसलमान, मराठे) येथे होऊन गेल्या, त्या त्या दोन्हीही भूप्रदेशांना समान अशाच होत्या. पूर्वकालीन शिलालेखांतून, ग्रंथनिर्मितीतून याचीच साक्ष पटते. यामुळे राजकारणाच्या क्षेत्रातील विविध अनुभव उभयतांना समान असेच होते. अठराव्या-एकोणिसाव्या शतकात येथे जी इंग्रजी राजवट उदित झाली, तिचेही स्वातंत्र्यप्राप्तीनंतर उभय प्रदेशांवर सारखेच वर्चस्व होते. शहाजीराजे यांचे दीर्घकाल बेंगळुरास वास्तव्य होते आणि पेशवेकाळात मुधोळ, जमखंडी, रामदुर्ग, जत यांसारख्या आजच्या कर्नाटकातील भूभाग, पेशव्यांच्या व पेशवेकाळानंतर निर्माण झालेल्या संस्थानिकांच्या अखत्यारीखाली होता; यातूनही मराठी-कन्नड संस्कृतीत

काही आदानप्रदान घडून आलेले आहे.

याहीपेक्षा महत्त्वाची बाब अशी की, या दोन्ही प्रदेशांतील लोकसंस्कृती, देवदेवता यांतही समानत्व आढळते. महाराष्ट्रातील वारकरी पंथाच्या आद्यदैवताला, श्रीविठ्ठलाला, 'कानडा विठ्ठल' असे संबोधिले जाते, हे सर्वपरिचितच आहे. यल्लम्मा, खंडोबा, शाकंभरी यांसारख्या देवदेवतांचे उपासक दोन्ही प्रांतांत आहेत. दोन्ही प्रांतांतील रीतिरिवाजांत, सोयरिकीत समान धागे गुंफलेले आढळतात. महाराष्ट्रात वैदिक-परंपरेचा प्रतिपाळ करणारी जी आचार्यकुले आहेत, ती दक्षिणेतून आली आहेत. कर्नाटकात फार मोठी मान्यता पावलेल्या लिंगायत धर्माचे प्रवर्तक श्री बसवेश्वर यांचा महाराष्ट्रातील मंगळवेढ्याशी संबंध होता, ज्ञानेश्वरांची एक परंपरा, विजापूर जिल्ह्यातील डंबळ येथे वास्तव्य करून होती, महाराष्ट्रातील एक थोर संत 'महाराष्ट्रमहोदयां'चे प्रवर्तक श्री एकनाथ महाराज यांच्या पत्नीचे माहेर कर्नाटकात होते, आणि एकनाथांचा नातू मराठीतील एक श्रेष्ठ पंडित कवी, मुक्तेश्वर, याचे बालपण कर्नाटकात गेले होते, त्याच्या 'महाभारत' रचनेवर कन्नडमधील महाभारत रचनेचा प्रभाव असल्याचे वाङ्मयेतिहासकारांनी दाखवून दिलेले आहे. वीरशैवांचे शिरोमणी श्रीमन्मथनाथ यांनी, मराठीतही काही रचना केली आहे. शिवरामस्वामींसारखा मराठीतील एक थोर कवी, कर्नाटकातच होऊन गेला. 'रसकौमुदी' हा मराठीतील रसविद्येवरील आद्य ग्रंथ, कर्नाटकातच निर्माण झाला. मूडलगींच्या स्वामींची मराठीतील ग्रंथरचना कर्नाटकातच निर्माण झाली, रामदासांचे काही मठ कर्नाटकात आहेत, विठोबाअण्णा दप्तरदारांचे मूळ वास्तवस्थळ बीदर आहे. हा जुना काळ सोडून आधुनिक काळाकडे वळल्यास, भावे-किर्लोस्कर प्रणीत मराठी रंगभूमीच्या प्रेरणास्थानी कन्नड रंगभूमी आहे, हे सर्वज्ञातच आहे. आधुनिक मराठी रंगभूमीचे प्रवर्तक अण्णासाहेब किर्लोस्कर हे मूळचे कर्नाटकातीलच. आधुनिक मराठीत क्रांती घडवून आणणारे केशवसुत व नवकाव्याचे प्रवर्तक बा.सी. मर्ढेकर यांचे वास्तव्य काही काळ धारवाडात झाले होते. मराठीतील एक थोर कथाकार जी.ए. कुलकर्णी हे कर्नाटकाचे रहिवासी, कविवर्य द.रा. बेंद्रे, श्रीरंग जहागिरदार या कर्नाटकातील थोर लेखकांचे महाराष्ट्राशी जिव्हाळ्याचे नाते आढळते, आजही डॉ. भीमाशंकर देशपांडे यांच्यासारखे संशोधक, कर्नाटकात राहूनच मराठीत संशोधनकार्य करीत आहेत. कर्नाटक - महाराष्ट्राच्या संस्कृतीशी व साहित्याशी संबद्ध असलेले गुरुदेव रा. द. रानडे, महर्षी विठ्ठल रामजी शिंदे, ज्योतिषाचार्य केतकर, अशी कितीतरी नावे समोर येतात. ही यादी आणखीही






वाढविता येण्याजोगी आहे. पण विस्तारभयास्तव आवरती घेतलेली बरी. "महाराष्ट्र व कर्नाटक यांचे भाषिक व सांस्कृतिक संबंध इतके जिव्हाळ्याचे आहेत की, या दोन्ही भाषांतील विद्वानांनी आणि संशोधकांनी परस्परभाषांचा अभ्यास केल्याशिवाय कोणताच प्रश्न निर्णायक रीतीने सुटणार नाही" असे आचार्य स. ज. भागवत यांनी शं.बा. जोशी यांच्या 'मऱ्हाटी संस्कृती' या पुस्तकास प्रस्तावना लिहिताना, जे उद्गार काढले आहेत, त्याची यथार्थता पटावी. महाराष्ट्राच्या पूर्वकालीन संस्कृतीचे साक्षेपी संशोधक डॉ. रा.चिं. ढेरे किंवा सेतुमाधवराव पगडी यांचा अभिप्रायही असाच आहे.

पूर्वकालचा हा भाग बाजूला ठेवला तरी आजही सोलापूर, कोल्हापूर, मिरज, सांगली या ठिकाणी अनेक कन्नड भाषक कुटुंबे दीर्घकालापासून वास्तव्य करून असल्याचे जसे आढळते, तसे आजच्या कर्नाटकातील गदग, हुबळी, धारवाड, बेळगाव, विजापूर, कारवार, बीदर, गुलबर्गा यांसारख्या ठिकाणी कितीतरी मराठी कुटुंबे पिढ्यानपिढ्या वास्तव्य करून असल्याचे दृश्य दिसते. आजही नोकरी धंद्याच्या निमित्ताने मैसूर-बेंगलोर येथे वास्तव्य करीत असलेली कितीतरी मराठी कुटुंबे आहेत. या सर्वांचे भाषाविषयक, शिक्षणविषयक, संस्कृतिविषयक गुंतागुंतीचे विविध प्रश्न सोडविण्याच्या दृष्टीने, उभय प्रांतांतील अल्पसंख्याकांच्या मनात जी दुय्यम नागरिकत्वाची भावना घर करून राहिली आहे, ती दूर होण्याच्या दृष्टीने या उभय संस्कृतीतील साम्यस्थळांप्रमाणे, प्रकृतिजन्य भेदस्थळांचाही विचार होण्याची गरज आहे.

महाराष्ट्राच्या तुलनेने कर्नाटक हा कृषिसंपन्न प्रांत आहे, यामुळे येथील नागरिक हा वृत्तीने मृदू, शांतताप्रिय व स्वपरंपरेला चिकटून राहणारा आहे, परंतु तुलनेने ही वृत्ती महाराष्ट्रात कमी आढळते, कारण कर्नाटकाचा महाराष्ट्राच्या ज्या भूभागाशी संबंध आलेला आहे, तो महाराष्ट्राचा भूभाग, बव्हंशी डोंगराळ आहे; यासाठीच 'राकट देशा, कणखर देशा, दगडांच्या देशा' असे कवी गोविंदाग्रजांनी महाराष्ट्राचे वर्णन केले आहे. यामुळे महाराष्ट्राच्या या भूभागातील प्रकृतीत, कर्नाटकाच्या तुलनेने अधिक लढाऊ बाणा आढळतो. वृत्तीने तो एकांडा व युद्धप्रिय आहे. त्याने भारताच्या बऱ्याच भूभागांवर पूर्वकाळी राजकीय वर्चस्वही गाजविलेले आहे. त्यातून निर्माण होणारा एक अहंभाव अजूनही त्याच्या मनात दबून बसला आहे.

मुंबई बेटाच्या सान्निध्यामुळे, सर्वांच्या आधी प्राप्त झालेल्या रेल्वेसारख्या सुविधेमुळे, मुंबई विश्वविद्यालयाच्या स्थापनेमुळे, आधुनिकतेचे वारे कर्नाटकाच्या

तुलनेने महाराष्ट्रात कितीतरी आधीपासून वाहत असल्यामुळे महाराष्ट्रीय मनात स्वश्रेष्ठत्वाचा, आधुनिक नागरत्वाचा, यातून निर्माण होणाऱ्या बुद्धिवादीपणाचा, वर्चस्वभावनेचा एक गंड निर्माण झाला आहे. यामुळे तो कन्नड माणसाला आपल्यापेक्षा कमी दर्जाचा लेखतो. कन्नड माणसाला सातत्याने विनोद विषय बनवितो. कन्नड माणसाच्या मनात यामुळे मराठी माणसाबद्दल दीर्घकाळ एक विरोधभावना, सुप्त वा प्रकट स्वरूपात वावरत आलेली आहे.

कर्नाटक महाराष्ट्राची मध्ययुगातील सांस्कृतिक-धार्मिक जडणघडणही काही बाबतीत भिन्न आहे. उदा. कर्नाटकात ज्याप्रमाणे शैव-वैष्णवांचा किंवा वैदिक-अवैदिक संस्कृतीचा संघर्ष आहे, किंवा लिंगायत व जैन धर्मीयांचे प्राधान्य आहे, तसे महाराष्ट्रात नाही. वैष्णवांच्या 'मठ' संस्कृतीचा महाराष्ट्रात अभाव आहे. वारकरी संप्रदायामुळे असेल, किंवा अन्य कारणांमुळे असेल, पण कर्नाटकाच्या तुलनेने महाराष्ट्रात धार्मिक समन्वयाचे धोरण पूर्वकालापासूनच अधिक प्रमाणात, अस्तित्वात आलेले आढळते.

महाराष्ट्रीयांच्या तुलनेने कन्नड भाषकांच्या मनात कन्नड भाषेच्या उपेक्षेचे शल्य, फार पूर्वीपासून नांदत आलेले आहे. दीर्घकाळपर्यंत कन्नड भाषिक प्रदेश, आंध्रप्रदेश, महाराष्ट्र, मद्रास, कुर्ग, मैसूर अशा राजवटीत विभागला गेला होता. या खंडिततेमुळे कन्नड भाषा व संस्कृती यांची उपेक्षा झाल्याचे शल्य कन्नड भाषकांच्या मनात दीर्घकाल घर करून राहिले आहे, त्यामुळे संयुक्त कर्नाटकाची निर्मिती होताक्षणी, त्याचा स्वभाषेचा अभिमान वाजवीपेक्षा अधिक प्रमाणात उफाळून वर आलेला आहे.

कन्नड-मराठी संदर्भातील हा सारा जमाखर्च, लक्षात घेऊनच यापुढे कन्नड-मराठीचे सामरस्य कसे साधता येईल, याचा विचार आपण केला पाहिजे, त्या दिशेने पावले टाकली पाहिजेत. साहित्यिक माध्यमातून ज्या प्रमाणात परस्परांचा आंतरिक परिचय होत जाईल, हृदयसंवाद साधला जाईल, त्या प्रमाणात आपले अपेक्षित ध्येय सिद्धीस जाईल. परस्परांतील वाढत्या आदान-प्रदानांमुळे, तुलनात्मक विचाराने, उभय भाषांतील साहित्यनिर्मिती ही अधिक कसदार होण्यास साह्य होईल.

उदाहरणार्थ, कर्नाटक हा परंपराप्रिय राहिल्यामुळे त्यातील साहित्याची मुळे जनमानसांत खोलवर रुजली आहेत, तशी ती मराठी साहित्यात कशी रुजतील, हे मराठी साहित्यिकाने पाहिले पाहिजे. कन्नड साहित्यातील स्त्रीदर्शन मराठी साहित्याच्या तुलनेने, अधिक विविधतापूर्ण आहे, ही बाबही मराठी साहित्यिकाच्या

लक्षात आणू देण्याची, तिची कारणमीमांसा करण्याची गरज आहे. मराठी साहित्यातील विनोदबुद्धीच्या अवलंबनातून व मराठी रंगभूमीच्या प्रयोगप्रवणतेच्या अनुसरणातून कन्नड रंगभूमीलाही काही शिकता यईल. आजचे प्रसिद्ध कन्नड नाटककार गिरीश कर्नाड यांच्या नाटकांचे कन्नड नाट्यसृष्टीपेक्षा मराठी नाट्यसृष्टीत अधिक समर्पकपणे सादरीकरण झाले आहे. ही वस्तुस्थिती कन्नड साहित्यिकांनी लक्षात घेण्यासारखी आहे. कर्नाडांची मातृभाषा कोकणी, शिक्षण इंग्रजीतून, नाट्यलेखन कन्नडमधून आणि त्यांच्या नाटकांचे अनुवादरूपात यशस्वी सादरीकरण, मराठीतून अशी वस्तुस्थिती आहे. ती अंगभूतपणेच कितीतरी बोलकी आहे.

फुले-आंबेडकरांच्यामुळे दलित साहित्याच्या प्रेरणा आणि प्रवृत्तीचा उगम, इतर कोणत्याही प्रांतापेक्षा जरी महाराष्ट्रात अधिक प्रमाणात झालेला असला, तरी मराठी दलितसाहित्यात कालांतराने जे एकांडेपण शिरले, त्याचा अभाव या प्रकारच्या कन्नडमधील बंडाय साहित्यात आढळतो. ही बाबही मराठीतील दलित लेखकांनी लक्षात घेण्यासारखी आहे.

कर्नाटक शासन कन्नड भाषेच्या व संस्कृतीच्या समृद्धीसाठी कन्नड स्वतंत्र विद्यापीठाची निर्मिती करते, संशोधनाला, साहित्यप्रकाशनाला भरघोस मदत करते, साहित्यिकांना विविध सुविधा उपलब्ध करून देते. ही बाबही मराठी शासनाने मराठी साहित्य-संस्कृतीच्या विकासाच्या अनुरोधाने विचारात घेण्यासारखी आहे.

खरे तर आजच्या स्वतंत्र बहुभाषक भारतात तौलनिक साहित्याभ्यासाचीही नितांत गरज आहे. त्याखेरीज आजच्या भारतातील संवेदनास्वरूपाबाबत या संवेदनांच्या आकृतिबंधांबाबत आपल्याला नीट कल्पना येणार नाही. उदा. दलितजागृतीची किंवा स्त्रीमुक्तीची चळवळ आज कमी-अधिक प्रमाणात भारतभर चालू आहे; या चळवळीतील बाह्य उपक्रमांची माहिती कदाचित आपल्याला मिळू शकेल; पण वस्तुतः आज या चळवळींचे अंतरंग समजून घ्यावयाचे झाल्यास, या विषयावर त्या त्या प्रदेशातील ललितसाहित्यच उपयुक्त ठरणारे आहे. म्हणून तौलनिक साहित्याचा हा मुद्दा मला आपल्यासमोर ठेवावासा वाटतो. मराठी दलित साहित्याचा परामर्श घेण्याच्या संदर्भात, मी या बाबतीतील इतर भाषांतील स्थितिगती पडताळून पाहण्याचा प्रयत्न करून पाहिला, पण त्यात अपेक्षित यश मला लाभू शकले नाही, हे मुद्दाम नमूद करावेसे वाटते.

विविध प्रदेशांतील केवळ साहित्याचा आशयच नव्हे तर त्याच्या

आविष्कारदिशाही समजून घेणे, आवश्यक आहे. त्याखेरीज स्वतःला स्वतःच्या साहित्यविश्वाचेही नीट आकलन होणार नाही, असे मला वाटते. उदा. मराठीत महाकाव्ये का निर्माण होत नाहीत? हा प्रश्न, मराठीसमीक्षेत दीर्घकाळ चर्चिला गेला, या नव्या काळात आता महाकाव्याचे युगच संपले, आजचे युग भावकाव्याचे आहे, असे एक उत्तर त्याला दिले गेले. या उत्तराने आम्ही आमचे समाधानही मानून घेत आलो आहोत. परंतु कन्नडमधील कूवेम्पू किंवा गोकाक यांसारख्या आधुनिकतम विश्वाचा परिचय असलेल्या कवींना आपल्या काळात कन्नडमध्ये अव्वल दर्जाची महाकाव्यनिर्मिती होणे शक्य आहे असे जाणवू लागले. मर्ढेकर मला थोडेफार कळतात, पण मर्ढेकरांच्या या नवकाव्याचे स्वरूप योग्यप्रकारे आकलन होण्याच्या दृष्टीने गोपाळकृष्ण अडिगांसारख्या कन्नड नवकवींचे किंबहुना इतर भारतीय भाषांतील समकालीन नवकवींचे काव्य, अनुवादरूपाने आपल्यासमोर आल्यास आपल्या नवकल्पनांच्या आकलनाची लांबी रुंदी वा खोली जाणून घेणे, सुलभ होणार नाही का? ते सुलभ होण्याच्या दृष्टीनेच 'आंतरभारती'ची सुंदर कल्पना, पूज्य साने गुरुजींनी मागेच आपणासमोर ठेविली आहे.

आंतरभारतीचे हे स्वप्न साकार करण्यासाठी आपली ही साहित्यसंस्था आरंभापासूनचे वचनबद्ध आहे. तिचा प्रारंभबिंदू म्हणून आपल्या घरच्याच गोष्टींना, कन्नड-मराठी संबंधांना, सुविहित रूप देण्याच्या कार्यक्रमाला आपण अग्रक्रम देणे, तत्त्वतः आणि व्यवहारतः समुचित ठरेल. यासाठी पुढीलसारखा काही कार्यक्रम मी आपल्यापुढे विचारार्थ ठेवीत आहे.

(१) भाषावार प्रांतरचना करताना, कर्नाटक-महाराष्ट्राच्या बाबतीत ज्या काही त्रुटी राहिल्या असतील, त्या दूर करण्यासाठी संघटित प्रयत्न करणे. खेडे हा घटक कल्पून जिथे विशिष्ट संख्येने मराठी भाषिक वा कन्नड भाषक नांदत असतील त्या भाषकांना, त्यांच्या भाषिक, सांस्कृतिक विकासासाठी त्या त्या शासनाकडून आवश्यक त्या सर्व सुविधा संबंधितांना कशा पुरविल्या जातील, हे पाहण्यासाठी प्रयत्नशील राहणे.

(२) पूर्वी असलेल्या या प्रकारच्या सुविधा आज ज्या ज्या ठिकाणी लुप्त झाल्या असतील, तेथे तेथे त्यांच्या पुनरुज्जीवनाचे प्रयत्न करणे.

(३) कर्नाटकात राहणाऱ्या मराठी भाषकांना, कर्नाटक प्रांत, कर्नाटक भाषा, इतिहास, संस्कृती, साहित्य, कला इत्यादींची माहिती देण्यासाठी ठिकठिकाणी केंद्रे स्थापन करणे, याच प्रकारची मराठी संस्कृतीची माहिती इतरांना कशी

होईल, हे पाहणे, त्या प्रकारची कार्यवाही अमलात आणणे; ग्रंथालयनिर्मिती, व्याख्यानमाला, चर्चासत्रे, प्रदर्शने इत्यादींच्या माध्यमांतून हे कार्य करता येईल.

(४) उभय प्रांतांतील साहित्यिकांशी जवळून संपर्क साधण्यासाठी, त्यांना एकत्र आणून परस्परांतील विचारविनिमयाची संधी वारंवार उपलब्ध करून देणे.

(५) महाराष्ट्र साहित्यपरिषदेच्या शाखोपशाखांना व कर्नाटकातील तत्सम साहित्यसंघटनांना यासाठी औपचारिक-अनौपचारिक पातळ्यांवरून प्रयत्न करण्यास प्रवृत्त करणे, या संदर्भातील दोन्ही प्रांतांतील आवश्यक ती माहिती सर्वांना उपलब्ध करून देणे, ती सर्वांना उपलब्ध होण्यासाठी महत्त्वाच्या ठिकाणी माहितीकेंद्रे उघडणे.

(६) दोन्ही भाषांच्या परिचयाचे, शिक्षणाचे वर्ग चालू करणे.

(७) मराठी व कन्नड अशा दोन भाषांतून एकाच प्रकारची माहिती देणारी नियतकालिके एकत्र स्वरूपात चालविणे.

(८) मराठी माध्यमातून उच्च शिक्षण घेऊ इच्छिणाऱ्यांसाठी विनाअनुदान पद्धतीचे महाविद्यालय स्थापन करणे. त्यासाठी योग्य अशा अभ्यासक्रमाची आखणी करणे.

(९) कर्नाटक राज्यातील विद्यापीठांतून आवश्यक तेथे मराठी विभागाची स्थापना करणे, या विभागातर्फे कर्नाटक भागात मराठी साहित्य-संस्कृतीच्या संदर्भातील संशोधनकार्याला चालना देणे.

(१०) महाराष्ट्रातही या प्रकारच्या सुविधा महाराष्ट्रातील कन्नड भाषकांकरिता निर्माण करण्याचा प्रयत्न करणे.

(११) पूर्वी महाराष्ट्राच्या सरहद्दीवरील भागांतील (कोल्हापूर, सांगली, सोलापूर इ.) महाविद्यालयांतून कन्नडच्या अध्यापनासाठी प्राध्यापक नेमण्याची प्रथा होती, आणि आज ती दुर्दैवाने लुप्त झाली आहे, तिचे पुनरुज्जीवन करणे, आज मुंबई विद्यापीठात कन्नड भाषेचा विभाग आहे, पण पुणे किंवा शिवाजी विद्यापीठात तो नाही, तो निर्माण होण्याची नितांत गरज आहे. आंतरप्रांतीय सांस्कृतिक आदान-प्रदानास त्याचे साह्य होईल.

(१२) कन्नड-मराठी भाषकांनी परस्परांच्या सण-सोहळ्यांत उत्साहाने सामील होऊन अनौपचारिक पातळ्यांवरून परस्परांचे संबंध वाढीस लावणे.

(१३) दूरदर्शन, नभोवाणी यांसारख्या माध्यमातून हे स्नेहवर्धक कार्य काही



अनुक्रमणिका

प्रमाणात का होईना, कसे सिद्धीस नेता येईल, याचा तपशील ठरविणे.

(१४) मुख्य म्हणजे, कन्नड आणि मराठीतील जुन्या-नव्या महत्त्वाच्या साहित्यकृती अनुवादरूपाने परस्परांना उपलब्ध करून दिल्यास, परस्परांत जवळीक निर्माण होण्यास कसे आणि किती साह्य होते, याचा यापूर्वी निर्देश केला आहेच, तथापि त्याचे महत्त्व जाणून त्याचा पुनरुच्चार करणे आवश्यक वाटते.

(१५) यासाठी योजनापूर्वक कालबद्ध कार्यक्रम आखणे, या क्षेत्रात काम करू इच्छिणाऱ्यांची यादी करणे, त्यांच्याशी संपर्क साधणे, अनुवाद चांगले कसे होतील हे पाहण्यासाठी या बाबतीत मार्गदर्शन करण्यासाठी कार्यशाळा स्थापन करणे, गरजेचे आहे. चांगल्या अनुवादांच्या उत्तेजनार्थ पुरस्कार देण्याची योजना आखावी. या दिशेने तातडीने हाती घेण्याजोगे खालील दोन उपक्रम मला आपल्यासमोर ठेवावेसे वाटतात :

(अ) स्वातंत्र्योत्तर काळातील मराठी व कन्नड साहित्यामधील विविध वाङ्मयप्रकारांचा परिचय करून देणारा, परामर्श घेणारा, ग्रंथ सिद्ध करून तो पुढील संमेलनाच्या वेळी प्रकाशित करण्याची योजना आपण त्वरेने हाती घ्यावी.

(ब) कर्नाटक आणि महाराष्ट्र या दोन्ही प्रदेशांच्या उन्नतीसाठी ज्यांनी ज्यांनी विविध क्षेत्रांत कार्य केले, अशा व्यक्तींची वा संस्थांची माहिती एकत्र करून ती संपादित स्वरूपात प्रसिद्ध करावी.

या कार्यासाठी लागणारे द्रव्य कसे संपादन करता येईल, हेही पाहिले पाहिजे. उभय भाषांतील मंडळींना, संस्थांना, शासनाला ही प्रकाशने उपयुक्त ठरणारी असल्यामुळे कर्नाटक-महाराष्ट्रातील शासन, विविध व्यक्ती व संस्था यांना यासाठी आवाहन करावे.

योग्य दिशेने प्रयत्न केल्यास, दोन्ही प्रदेशांतील उद्योगपती अर्थ साहाय्यासाठी पुढे येतील असा विश्वास वाटतो. महाराष्ट्रातील सांस्कृतिक कार्यासाठी परदेशातील फोर्ड प्रतिष्ठान भरघोस साहाय्य देते, असा अनुभव आहे, तेव्हा या बाबतीत योग्यप्रकारे प्रयत्न केल्यास, आपणास आर्थिक साहाय्य मिळेल, असा विश्वास वाटतो.

आपणासारख्या कार्यकुशल मंडळींना माझ्यासारख्या या क्षेत्रातील अनभिज्ञ व्यक्तीने या बाबतीत काही सांगावे, अशी स्थिती नाही या औद्धत्याबद्दल मी आपली

क्षमा मागतो आणि वर सुचविलेल्या कार्यक्रमात माझा जो खारीचा वाटा असेल तो उचलण्यास मी आनंदाने सज्ज आहे, एवढे आपणास आश्वासन देऊन, माझे हे अपेक्षेपेक्षा लांबलेले भाषण, आपण शांतपणे ऐकून घेतलेत, याबद्दल आपणा सर्वांचे मन:पूर्वक आभार मानतो.

■

---

## न संपणारा खजिना

स्वयंपाकाच्या कृष्णाबाई मुळे खादीचं जाड आलवण नेसायच्या. त्या दिवसाकाठी बोलता-बोलता पाच-दहा तरी म्हणी वापरायच्या. एखादी गोरीपान पण अवगुणी बाई असेल तर म्हणायच्या, 'एक गोरी, बत्तीस गुण चोरी.' कुणाच्या स्वार्थी वृत्तीचं वर्णन करायचं झालं तर सांगायच्या 'माझा लोभ तुझ्या घरी, तुपानं द्रोण भरी.' निरुद्योगी बायकांना उद्देशून पुटपुटायच्या, 'काम नाही घरी, सांडून भरी.' त्या स्वत:ला नेहमीच म्हाताऱ्या समजायच्या. त्यामुळं घरातल्या तरुण मुलांना उद्देशून म्हणायच्या, 'तरण्याचं झालं कोळसं अन् म्हाताऱ्याला आलं बाळसं.' त्यांचं एखादं वाक्य समजलं नाही तर मी विचारायची, 'कृष्णाबाई, तुम्ही आता काय म्हणालात?' लगेच त्या उत्तर द्यायच्या, 'कसचं काय वहिनी ? पायाला पडसं अन् नाकाला नारू. दुसरं काय ?' त्यांना लाजलज्जेची भावना फारशी नव्हतीच. पुरुषमाणसं आसपास फिरत असली तरी अंगावरचं आलवण बदलायला निघायच्या. असं करू नका, म्हटलं की फणकारायच्या, 'वस्त्राआड जग नागडं, त्यात काय चोरायचं ?' गप्पांमधे कुणाच्या घरातल्या भांडणांचा काही विषय चालू असला की म्हणायच्या, 'सख्ख्या सासूचा कापला कान, मावससासू मागती मान.'

कधी न संपणाराच त्यांचा हा खजिना होता. दररोजच्या कामाच्या रगाड्यात आम्ही त्याकडं कधी लक्ष दिलं नाही. आता वाटतं, हे सगळं आपण उतरवून घ्यायला हवं होतं. अजिबात न शिकलेल्या बाईचं हे मोठं, ऐकत रहावं असं धन होतं.

■

(**"आठवणी काळाच्या...माणसाच्या", सरस्वतीबाई अकलूजकर, राजहंस प्रकाशन,** पुणे. २०००, पृ. २०८-२०९)

# आपलीच भाषा आणि...

सुमन बेलवलकर

चंदन, सांबार आणि फिल्टर कॉफीच्या घरंदाज वासाने दरवळलेल्या नगरीत - म्हैसूरमध्ये आम्ही दोन बाया हौसेने खरेदी करत होतो. पोटपूजेचा प्रश्न आला तेव्हा खाणाखुणा लक्षात ठेवलेलं एक हॉटेल मधुबेनने शोधून काढलं. नाव पाहिलं तर 'Nalpak' माझा भाषेचा धंदा म्हणून त्या शब्दाकडे माझं लक्ष गेलं. काय असावा बरं तो शब्द? नालपाक, नलपक, नालपक करत आम्ही दोघी त्याचं कोडं सोडवत होतो. शेवटी राजश्रीला विचारलं तर ती म्हणाली, "अग, ते नळपाक! समोर तमिळ भाषी जयराम असल्यामुळे मी इंग्रजीत म्हटलं, "Damn with this Roman script of yours! only because of the script, I was unable to get the proper word" रोमनलिपी सोपी आहे खरी - पण आंतरराष्ट्रीय ध्वनिलिपीसाठी उच्चारचिन्हे बनवताना तिला खूप कसरत करावी लागली. कारण ती चिन्हानुसारी (सिलॅबिक) आहे. देवनागरी उच्चारानुसारी असल्यामुळे अक्षरे पाहून मजकूर उच्चारता तरी येतो. रोमनमधला उच्चार शब्द माहीत नसेल तर करता येत नाही (उदा. Put/But)

दक्षिणी लोक केवळ आरंभशूर असतात असे नाही. ते शीर्षकवीरही असतात. बंगळूर स्टेशनवरच्या Fast food केंद्राला त्यांनी 'विस्मया' हे नाव दिलं आहे. (हॉटेलांना नावं इतकी औचित्यपूर्ण तर लाडक्या मुलामुलींची कशी ठेवत असतील!) नळराजाचा पाककलेशी असलेला संबंध महाभारताच्या वनपर्वात नलोपाख्यानात विशद केला आहे. दमयंतीच्या स्वयंवराला तिच्या प्राप्तीच्या लोभाने आलेले इंद्रादी देव तिच्या चातुर्याने विवाहसमयी वरदाते झाले. दमयंतीने दिलेल्या वडिलकीच्या भूमिकेतून नळाला यमाने अन्नरस आणि धर्म यावर पूर्ण निष्ठा राहील असा वर दिला. अग्नी आणि वरुण यांना कोणत्याही इच्छितस्थळी आग आणि पाणी निर्माण करण्याची क्षमता दिली. पृथ्वीवरचा मानव या दोन्ही बाबतीत परस्वाधीनच असतो. दमयंतीचा त्याग करून ऋतुपर्ण राजाकडे बाहूक नावाच्या










सारथ्याच्या रूपात राहणारा नळराजा योगायोगाने तिला भेटला. त्या वेळी त्याला केवळ कोरडा शिधा देऊन तिने आपल्या दासीला त्याच्यावर पाळत ठेवायला सांगितले. परिणामी त्याची ओळख पटली असा तो संदर्भ आहे. एवढा धांडोळा घेऊन राजधानीतल्या उपाहारगृहाला अय्यांनी नाव दिलं 'नळपाक'. नळाला पाणी नाही आलं तरी, गॅस संपलेला असला तरी हे स्वयंपाक करू शकतात असा मनाशी अर्थ लावून मी निर्धास्त झाले होते. पण शोध घेतला नसता तर केवळ परक्या लिपीमुळे मला यातले काहीच समजले नसते.

'आपलेच दात आणि आपलेच ओठ' ही म्हण अगतिकता दाखवत असेल; पण 'आपलीच भाषा आणि आपलीच लिपी' हे अद्वैत मात्र तोडता येत नाही. रोज भेटणारा पोस्टमन गणवेशाशिवाय ओळखता येत नाही, तशी काहीशी ही जोड असते.

■

**एफ ४४, सुंदरनगरी, ३०८, सोमवार पेट, पुणे - ४११ ०११.**

---

प्राचीन काळी गुरूला अनन्यसाधारण असं महत्त्व होतं. विद्यार्थ्याला वेगवेगळ्या विषयांची ओळख करून देणं, त्याच्या बुद्धीची जोपासना व वृद्धी करणं, त्याला स्वावलंबी आणि समाजोपयोगी असा उत्तम नागरिक म्हणून तयार करणं, हे गुरुचं मुख्य कर्तव्य होतं. विद्यार्थ्याला अज्ञानाच्या अंधकारातून ज्ञानाच्या प्रकाशाकडे नेता नेता त्याला चारित्र्यसंपन्न करणं हे देखील गुरूचं कर्तव्य होतं. शिक्षण हा सर्वथैव बुद्धिमंतांचा - शिक्षणशास्त्रज्ञांचा विषय होता. राजकारण्यांना त्यात मुळीच स्थान नव्हतं. राजकारण्यांचा शिक्षणक्षेत्रातील प्रवेश टाळला पाहिजे. ते वातावरण विद्यार्थ्यांच्या स्वतंत्र आणि वस्तुनिष्ठ अशा नैतिक आणि बौद्धिक विकासाला पोषक असणार नाही. प्राचीन काळातील शिक्षक हा कुठलीही व्यक्ती, संस्था किंवा पंथाच्या प्रभावाखाली काम करीत नसे, आणि तरी देखील त्याचा दबदबा इतका होता की, अगदी राजा देखील त्याचा आदरसत्कार करून त्याचा उपदेश शिरसावंद्य मानीत असे. आणि कुणीही अगदी राजादेखील त्याच्यावर सत्ता चालवीत नसे. पण आज तशी परिस्थिती आहे असं आपण म्हणू शकू कां?

■

**(अंकुश सावंत "उर्च्चशिक्षणातील समस्या", 'परामर्श' मे-जून-जुलै - २०००)**

---



अनुक्रमणिका






# एक कागद घ्यावा

र. कृ. जोशी

एक कागद घ्यावा
वरून खालून थोडा खुडावा
आलटून पालटून
त्यावरून हात फिरवावा
तो स्पर्श
मनात काहीबाही सांगू गेला तर .....

तरच

शाईत न्हालेली काही अक्षरं घ्यावीत
कंठातली काही डावीकडं - कातरलेली
ओठातली काही अधे मधे - पेरलेली
महाप्राणात बुडवलेला ह मधोमध
ठेवणीतली खांडं एक दोन जाडी

मग
अकार इकार जोडावेत मनाजोगे
काही थंड अनुस्वार
तिखट विसर्ग जरा जपून
तुर्च्यात एक अर्धचंद्र मांडावा
अर्थपूर्ण रफार
गौरवम् औकार
लालित्यपूर्ण काही जोडाक्षरं
उकार सहित लागल्यास उपमा
चवीपुरता एखादा शब्द

शांतपणे कविता लावावी
घडी करून खिशात कोंबावी

अक्षरचिंतन करीत रहावं
बारीकसा अर्धगंध सुटत राहतो.

बऱ्याच वर्षांनंतर
लोक म्हणतात - आणखी एक कविता लावा
तेव्हा आपण नसतो
कविता असते.

■

**बी - ९, बकुल म. फुले सोसायटी, ६६/६७ शिवसृष्टी,**
**कुर्ला (पू.) मुंबई - ४११ ०२४.**

---

**निवेदन**

## महाबँक भाषाविषयक लेखन पारितोषिक - २००१

मराठी अभ्यास परिषद महाराष्ट्र बँकेच्या सहकार्याने १९८३ पासून महाबँक भाषाविषयक लेखन पारितोषिक देते आहे. पारितोषिकाची रक्कम रु. ५०००/- अशी आहे. २००१ च्या पारितोषिकासाठी १९९९ आणि २००० या दोन वर्षातील लेखन विचारात घेतले जाणार आहे. प्रकाशित आणि अप्रकाशित भाषाविषयक लेखनासंबंधीची माहिती किंवा लेखन परिषदेच्या कार्यवाह, नीलिमा गुंडी यांच्याकडे ३० सप्टेंबरपर्यंत पाठवावे किंवा सुचवावे.

**संपर्क पत्ता**

**नीलिमा गुंडी**
**३, अन्नपूर्णा, १२५९, सुभाषनगर, ५ वी गल्ली, शुक्रवार पेठ, पुणे - ४११ ००२.**
**दूरध्वनी - ४४८६०१५**

---

# संवेदनशीलमनाने घेतलेला भाषानुभव

सरिता पदकी

[लेखिका : डॉ. नीलिमा गुंडी. परीक्षित पुस्तक : 'शब्दांची पहाट' ग्रंथाली प्रकाशन, मुंबई, २०००, पृष्ठे ५४, मूल्य ४५/- रु.]

डॉ. नीलिमा गुंडी हे एक मान्यताप्राप्त नाव आहे. कविता, वाङ्मय, असे थोडेसेच पण लक्षणीय लेखन त्यांनी केलेले आहे. काही संपादनाचे कामही त्यांनी सिद्ध केलेले आहे आणि एका महाविद्यालयात त्या मराठीचे अध्यापनही करतात. हे अशासाठी सांगितले की, भाषेच्या विविध आविष्कारांमध्ये नीलिमा गुंडी रममाण झालेल्या आहेत.

आणि हो, मुख्य सांगायचं म्हणजे त्यांना एक मुलगी आहे - मुक्ता नावाची. ती जेव्हा छोटी होती तेव्हा तिच्या मनोमुखी उमटलेल्या शब्दांच्या पहाटेच्या अनेक रंगांचे आणि रूपांचे दर्शन 'शब्दांची पहाट' हे पुस्तक घडवते.

कशी फुटत असेल प्रत्येक माणसाची शब्दाची पहाट ? अर्थपूर्ण असा पहिला नादोच्चार कसा होत असेल तान्ह्या बाळाच्या ओठातून ? केवढी अवघड प्रक्रिया आहे ही, दिसताना अगदी सहज सोपी दिसत असली तरी. अगदी जन्मल्या क्षणापासून (का गर्भधारणेच्या क्षणापासून ?) अनेक संवेदना आणि कोट्यावधी लहान मोठे नाद बाळाच्या मेंदूवर झेपावत असतात. अवतीभोवतीची माणसे त्या संवेदनाचा विवक्षित नादाशी मेळ घालत असताना ते बाळ प्रयत्नपूर्वक किंवा अजाणतेपणी पहात असते. तसे आपल्यालाही जमावे म्हणून कसून प्रयत्न करीत असते. श्वास, कंठ, ओठ, जीभ या इतक्या अवयवांवर प्रभुत्व मिळवून आपल्या अनुभवाला नादोच्चार देताना बाळाला कुठल्या कुठल्या अनुभवांच्या जंगलातून आणि वाळवंटातून जावं लागत असेल ! हा सारा विचार जेवढा मनोरंजक तेवढाच थकवणारा आहे.

पण आपल्या मुक्ताने हे झुंजूमुंजू केव्हाच पार केले आहे. आता ती बऱ्याच

समर्थतेने शब्द वापरू शकते आहे. ती आईची 'गांधारी' होते, आईच्या अंगाईतल्या प्रत्येक शब्दाचा अर्थ विचारते, चांदोमामा मला सांगतोय सारसबागेत जा म्हणून, असे आईला सांगून आपल्या मनासारखे करून घ्यायचा प्रयत्न करते आहे. घरातले संस्कार शब्दप्रेमाचे असल्याने ती असे वेगवेगळे शब्द तर वापरतेच पण चक्क कविता देखील करते.

आपल्या मुलीची ही भाषेची क्रीडा नीलिमाताईंनी प्राध्यापिकेच्या चिकित्सक, कवयित्रीच्या संवेदनाशील आईच्या वत्सल दृष्टीने पाहिलेली आहे आणि नोंदवून ठेवलेली आहे. मुलांची भाषा आणि त्यांच्या संवेदनशीलतेतील अनेक पैलूंवर प्रकाश टाकत जाते याचे असे तिहेरी भान त्यांना असल्यामुळे हे पुस्तक वाचनीय झाले आहे.

आईमुलीच्या नात्यातील तरलता या प्रसंगात आणि या भाषेत कशी व्यक्त झालीय पहा, "आईपणाचे सत्त्व राखणे सोपे नसते. मुलीसाठी रात्री खूप जागरण झाले असल्यामुळे एकदा माझे मन माझ्या ताब्यात राहिले नाही. तेवढ्यात गाईचे हंबरणे ऐकू आले तेव्हा मी तिला त्या हंबरण्याची भीती दाखवली. रात्रीच्या वेळी तो आवाज खरोखरच भेसूर वाटला. मुलगी घाबरून झोपलीसुद्धा. पण तिच्या मनात ती भीती किती दबा धरून बसली होती त्याचे प्रत्यंतर लवकरच आले. एकदा दुपारी गाईचे हंबरणे ऐकू आल्याबरोबर ती धावत येऊन मला बिलगली आणि म्हणाली, "आई, हम्मा येईल." मग स्वतःच स्वतःची समजूत घालत म्हणाली, "पण आई आहे!" ....."

मी जे वर तिहेरी भान म्हटले त्याचे हा उतारा म्हणजे एक उत्कृष्ट उदाहरण आहे. मुलीच्या मनाच्या अगदी आत जाणे, त्या मनासकट तिचे शब्द ऐकणे आणि त्याच्या अतिसूक्ष्म अर्थांची नोंद करणे असे यांसारख्या अनेक उदाहरणांतून आपल्याला दिसून येईल. आणि आपणही घेतलेल्या अशा असंख्य अनुभवांचे सूर आपल्या मनात जागे व्हायला लागतील. शब्दांची पहाट व्हायला वयाचं बंधन थोडेच असते ? मागे आम्ही काही मैत्रिणी अनाथाश्रमातल्या मुलींशी बोलायला - खेळायला जात होतो. तिथे एक आठ वर्षांची मुलगी होती. ती मुकी आहे असे सगळ्यांनी सांगितले होते. पण पुढे पुढे, आम्ही नियमित पणे त्या मुलीकडे जायला लागल्यावर ती मुकी मुलगी चक्क बोलायला लागली. नंतर तिचे बोलणे कसे थांबवावे हा प्रश्न आम्हांला पडायला लागला.

एकदा एक आयरिश, एक जर्मन, एक अमेरिकन आणि एक मी भारतीय

अशा चौघीजणी इंग्रजीत, एकमेकींशी बोलत होतो. भाषा इंग्रजीच पण आमच्यापैकी प्रत्येकजण ती वेगवेगळ्या ढंगाने बोलत असल्याने एकमेकींना एकमेकींचे ओ की ठो कळेना, शेवटी आम्ही लक्षपूर्वक प्रत्येकीची बोलण्याची ढब समजावून घेतली आणि मग शब्दांची पहाट उगवली.

आणि काही .आजारामुळे वाचा गेलेली माणसे पुन्हा नव्याने एकेक शब्द बोलायला शिकतात तेव्हा ? केवढ्या अंधारातून ती पहाट होत असते!

या आणि अशा शब्दांच्या पहाटांची आठवण नीलिमाबाईंचं पुस्तक करून देते.

या साऱ्याबद्दल आपण नीलिमाताईंना आणि हो, न विसरता मुक्ताला देखील धन्यवाद द्यायला हवेत!

■

**दशभुजा गणपतीसमोर, पौड फाटा, कर्वे रोड, पुणे - ३८.**

---

## परिषद वार्ता

ज्येष्ठ मुद्रित शोधक मोहन वेल्हाळ यांचे मे महिन्यात निधन झाले. परिषदेचे आणि त्यांचे जिव्हाळ्याचे संबंध होते. मानधन न घेता त्यांनी 'भाषा आणि जीवन' चे मुद्रित शोधन चार पाच वर्षे केले होते, ते केवळ मराठी भाषेच्या प्रेमामुळेच ! परिषदेतर्फे त्यांना श्रद्धांजली.

■

**१. 'मराठी अभ्यास परिषद पत्रिका : भाषा आणि जीवन'ची वर्गणी :**

वर्गणी भरण्यासाठी पत्रिकेचे वर्ष जानेवारी ते डिसेंबर असे आहे. या त्रैमासिकाचे वर्षात चार अंक निघतात. वर्गणीची आकारणी पुढीलप्रमाणे :

वार्षिक वर्गणी - संस्थेला रु. १०० फक्त
व्यक्तीला रु. ७५ फक्त
परदेशातील व्यक्ती / संस्था २० डॉलर

**२. पैसे भरण्याबद्दल सूचना :**

वर्गणी प्रत्यक्ष रोखीने किंवा धनादेशाने देता येईल. कृपया मनिऑर्डर पाठवू नये. धनादेश 'मराठी अभ्यास परिषद' या नावाने काढावा. धनादेश पुण्याबाहेरच्या शाखेचा असल्यास रकमेत ५ रुपये वटणावळ अधिक घालावी. धनादेशासोबत आपले नाव, पत्ता, रक्कम, कोणत्या वर्षासाठी ते अवश्य लिहावे. पावती दिली जाईल. नमुना अंक मिळाला असल्यास कोणता याचा उल्लेख करावा.

वर्गणी व तत्संबंधी पत्रव्यवहाराचा पत्ता : नीलिमा गुंडी, ३, अन्नपूर्णा, १२५९, शुक्रवार पेठ, सुभाषनगर गल्ली क्र. ५, वाडिया हॉस्पिटलसमोर, पुणे ४११ ००२. दू. क्र. ४४८६०१५

**३. मागील अंक :**

'भाषा आणि जीवन' हे त्रैमासिक १९८३ पासून प्रसिद्ध होत आहे. (१९८३ या वर्षी मात्र दोनच अंक निघाले आहेत.) एखाद दुसऱ्या अंकाचा अपवाद वगळता सर्व वर्षांचे अंक उपलब्ध आहेत. १९८३ ते १९९० पर्यंतच्या प्रत्येक अंकाची किंमत रु. १०/-, १९९१ पासून पुढील वर्षातील प्रत्येक सुट्या अंकाची किंमत रु. २०/-.

**४. प्रकाशने :**

या त्रैमासिकातील निवडक लेखांचे संपादित पुस्तक 'निवडक भाषा आणि जीवन' (किंमत रु. २००) परिषदेच्या कार्यवाहांकडे अथवा मेहता पब्लिशिंग हाऊसमध्ये मिळू शकेल. तसेच 'भाषांतरमीमांसा' हे पुस्तकही कार्यवाहांकडे अथवा प्रतिमा प्रकाशनाकडे उपलब्ध आहे.

**५. जाहिरातीसाठी दर :**

पूर्णपान ७५० रु., अर्धेपान ४०० रु., पाव पान २५० रु., शुभेच्छा सूचना १०० रु., आवरण पृष्ठ तीन / चार ८०० रु. जाहिरात मराठीत असल्यास उत्तम, हिंदीत, इंग्रजीत असल्यास चालेल.

R.N.I.नोंदणी क्रमांक : ०-४००४८/८३

## ● आपण मराठी-अभ्यास-परिषदेसाठी काय करणार?

➢ सभासद नसाल, तर प्रथम स्वतः सभासद व्हा.

➢ सभासद असाल, तर देणगीदार / आश्रयदाते सभासद आणि वार्षिक सभासद मिळवून द्या.

➢ परिषदेसाठी काही नियमित वेळ देऊ शकत असाल तर चिटणिसांशी संपर्क साधा.

➢ परिषदेचे सर्व कार्यकर्ते आपले नित्याचे काम सांभाळून परिषदेची कामे करीत असल्यामुळे एकाच्या जागी चार कार्यकर्ते लागतात.

➢ परिषदेने प्रकाशित केलेल्या पुस्तकांच्या विक्रीसाठी साहाय्य करा.

➢ परिषदेचे काम वाढविण्यासाठी नवनव्या कल्पना सुचवा.

## ● आपण पत्रिकेसाठी काय करू शकता?

➢ लेखन पाठवा.

➢ परभाषांतून अनुवाद करा.

➢ ग्रंथपरीक्षणे लिहा.

➢ 'पुनर्भेट' किंवा 'वाघिणीचे दूध' या सदरास योग्य अशा मराठी किंवा अन्य भाषेतील मजुकराबद्दल सूचना पाठवा.

➢ भाषेसंबंधी वार्ता, भाषादोषांची उदाहरणे, चांगल्या भाषेची उदाहरणे, इत्यादींशी संबंधित वृत्तपत्रीय किंवा इतर कात्रणे पाठवा.

➢ पत्रिकेत भाषा-व्यवहाराशी संबंधित हास्यचित्रे द्यायची कल्पना कशी वाटते?

➢ जाहिरात मिळवून द्या.

➢ संस्था-वर्गणीदार मिळवून द्या.

**संपर्क**

**मराठी अभ्यास परिषद**

३, अन्नपूर्णा, १२५९, शुक्रवार पेठ, सुभाषनगर गल्ली क्र. ५,
वाडिया हॉस्पिटलसमोर, पुणे ४११ ००२.
(दू. क्र. ४४८६०१५)